अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ८३

केशवराव वासुदेव बापट गंगाजळीवाले कवाडकरविरचित
श्रीमद्भागवत दशमस्कंध अंतर्गत

# रासपंच्याध्यायी

(लावणी छंदावर)

संपादन व विवरण
**डॉ. सौ. भाग्यलता अशोक पाटसकर**

प्रधानसंपादक
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु

संपादक
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
रामटेक, जि. नागपूर (महाराष्ट्र)

२०२०

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | – | **रासपंच्याध्यायी** |
| **संपादन व विवरण** | – | **डॉ. सौ. भाग्यलता अशोक पाटसकर** |
| **प्रधानसंपादक** | – | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | – | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | – | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | – | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | – | **२०२०** |
| **आवृत्ती** | – | **प्रथम** |
| **मूल्य** | – | **रू. ३५०/–** |
| **आय.एस.बी.एन.** | – | ९७८–९३–८५७१०–४०–७ |
| **मुखपृष्ठ** | – | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | – | **अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग, नागपूर** |
| **प्रकाशक** | – | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

सरस्वती श्रुतिमहती महीयताम्

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron

Hon'ble Nitin Gadkari

Minister of Road, Transport & Highways of India

## Patron

Prof. Shrinivasa Varakhedi

Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President

Prof. Gautam Patel

Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary

Prof. Saroja Bhate

Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary

Prof. Penna Madhusudan

Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary

Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee

Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

माझ्या दोघी स्नुषा,

सौ. स्मिता चिन्मय पाटसकर

आणि

सौ. गायत्री शंतनू पाटसकर,

यांना आशीर्वादपूर्वक,

- सौ. भाग्यलता पाटसकर

# अनुक्रमणिका

# संक्षेपसूची

अ. - अध्याय (रासपंच्याध्यायीतील)

क. – कडवे

चा. – चालबदल

ला. – लावणी

धृ. – ध्रुवपदासाठी लावणीकारांनी वापरलेला संक्षेप

# मनोगत

माझे परमपूज्य सद्गुरू स्वामी गोविंददेवगिरि यांच्या माधुर्यपर्यवसायी वाणीतून तृप्तातृप्तविलक्षणा अशी श्रीमद्भागवतकथा अनेकदा ऐकण्याचे भाग्य मला लाभले. त्यामुळे गुरूंच्या इच्छेने आणि गुरूंच्या कृपेनेच **श्रीमद्भागवत दशमस्कंध रासपंच्याध्यायी – लावणी छंदावर** हा ग्रंथ माझ्या हाती आला आणि त्यांच्याच प्रेरणेने आणि आशीर्वादाने मी काही लिहू शकले. मी त्यांच्या चरणी नतमस्तक आहे.

ही प्रेरणा पुढे कार्यान्वित करण्यासाठी माझ्या वैदिक संशोधन मंडळ (आदर्श संस्कृत शोध संस्था), पुणे या ऑफिसमधल्या सौ. माधुरी कुदळे आणि मुग्धा गोडबोले यांनी फार परिश्रम घेतले. सौ. माधुरीने अतिशय वेगाने पण बिनचूक व सफाईदार डीटीपी केले. मुग्धाने संदर्भ शोधणे, मुद्रित शोधन यात मदत केली. या दोघींना भगवंताने सुख व समृद्धी द्यावी अशी मी त्याच्या चरणी प्रार्थना करते. मी या कामात गुंतलेली असता सौ. अर्चना बोकील यांनी ऑफीसचे काम अगदी चोख संभाळले. मी त्यांची मनःपूर्वक आभारी आहे.

वैदिक संशोधन मंडळाच्या व्यवस्थापन समितीच्या अध्यक्षा प्रा. डॉ. सरोजा भाटे आणि वैदिक संशोधन मंडळ, (आदर्श संस्कृत शोध संस्था), पुणे याचे अध्यक्ष डॉ. रवींद्र मुळे यांचा मला नेहमीच मोठा आधार वाटतो.

माझे कुटुंबीय तर सदैव माझ्या पाठीशी असतातच. या सर्वांची मी ऋणी आहे.

या 'रासक्रीडे'स प्रकाशात आणण्याची योजना कार्यान्वित करणारे कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक याचे कुलपती प्रा. डॉ. श्रीनिवास वरखेडी आणि अन्य पदाधिकारी यांच्याप्रती बद्धःप्रणामाञ्जलिः।।

सप्टेंबर २०१९

डॉ. सौ. भाग्यलता पाटसकर

संचालिका,

वैदिक संशोधन मंडळ

(आदर्श संस्कृत शोध संस्था), पुणे

---

# श्रीमद्भागवत दशमस्कंध रासपंच्याध्यायी – लावणी छंदावर

## प्रस्तावना

श्रीमद्भागवताचा प्रादेशिक भाषेतील एक रसाळ आणि गेय अनुवाद म्हणून 'श्रीमद्भागवत दशमस्कंध रासपंच्याध्यायी - लावणी छंदावर' या छोटेखानी साहित्यकृतीचे एक वेगळेच महत्त्व आहे.

ही पुस्तिका ठाणे येथील अरुणोदय छापखान्यात इ. स. १८७३ (शके १७९५) साली छापली गेली.

या पुस्तकाचा 'कर्ता' (म्हणजे आपल्या भाषेत रचयिता) केशवराव वासुदेव बापट गंगाजळीवाले कवाडकर हे आहेत. त्यांनी आपले निवासस्थान तालुके भिवंडी जिल्हा ठाणे, हल्ली वस्ती लष्कर नजिक ग्वाल्हेर असे दिले आहे. ही पहिली आवृत्ती असून मालकीचा हक्क त्यांनी स्वतःकडे ठेवल्याचे नमूद केले आहे.

सदर पुस्तक श्रीमंत महाराज राजेश्री जयाजीरावसाहेब शिंदे अलि ज्या बाहादुर दाम इकबालहू यांस अर्पण केले आहे. नासिक येथील कै. श्रीधरशास्त्री वामनराव देशपांडे अग्निहोत्री यांचा दुर्मिळ पोथ्या व पुस्तकांचा संग्रह सुमारे १०/१२ वर्षांपूर्वी वैदिक संशोधन मंडळास मिळाला. या संग्रहात सदर पुस्तक मिळाले. संग्रहकर्त्याने या पुस्तकाची नोंद 'लावणीभागवत' अशी केली आहे. मला असे वाटते ही या साहित्यकृतीची अगदी योग्य ओळख आहे.

प्रस्तावनेत कवी म्हणतात, 'श्रीभगवंताचि लिला कोणि व कसे हि तऱ्हेनि गाइली किंवा गावविली त्याजवर परमात्मा कृपाच करीत आहे अशि त्यांचिच प्रतिज्ञा असल्यावरून खाली लिहिलेले श्रीमद्भागवतातिल दशमस्कंधात रासपंच्याध्यायी म्हणून जी श्रीकृष्ण अवतारीं गोकुळांत क्रिडा केली।। त्याजवर प्राकृत भाषेत लावण्या छंदानि स्तोत्र यथामती कवन केले आहे.'

या कवनात वाक्यार्थ संगती चांगली रहावी म्हणून हे सर्व कवन के. वा. बापट यांनी वेदशास्त्रसंपन्न शितारामशास्त्री केळकरांकडून तपासून घेऊन त्यात त्यानुसार दुरुस्त्याही केल्या आहेत. पुढे कवी म्हणतात की, 'रासक्रीडेस शारदी पौर्णिमेच्या दिवशी चंद्रोदयाचे बरोबर श्रीकृष्णाने कुंजवनात मुरली वाजवून आरंभ केला आणि प्रातःकाल होण्याचे समयी ब्राह्ममुहूर्तावर त्या क्रीडेची समाप्ती झाली. त्यानुसार आरंभापासून रागदारीवर ह्या लावण्या कविल्या आहेत. त्यातील रस भगवद्भक्त घेतीलच.'

याचा उपयोग कीर्तनात, पुराणात वा गायनीत सर्व ठिकाणी घेण्यासारखा आहे, असे कवींनी प्रस्तावनेत नमूद केले आहे.

पुढे प्रत्यक्ष कवनाच्या सुरवातीला ते म्हणतात की, 'रासपंच्याध्याय्या अर्थप्रकाशकानि प्राकृतसंस्कृतमिश्रितानि पदानि विरच्यये'

म्हणजे ही मराठी अर्थाने पदे म्हणजे गाणी किंवा गेय रचना आहेत आणि मुख्य म्हणजे ही गाणी नुसतीच आधारित नसून मूळ भागवताचा अर्थही विशद करणारी आहेत.

अशा एका वैशिष्ट्यपूर्ण साहित्यकृतीची आजच्या मराठी जगाला ओळख व्हावी हा हेतू या संपादना मागे आहे.

**रचना –**

श्रीमद्भागवतातील काही भागाचा हा पद्यबद्ध अनुवाद आहे, जसा विनोबांनी गीताई हा गीतेचा पद्यबद्ध अनुवाद केला आहे. कालिदासाचे मेघदूत, माऊलींची ज्ञानेश्वरी, काही उपनिषदे तसेच भर्तृहरिचे नीतिशतक यांचेही असेच पद्यबद्ध अनुवाद झालेले आहेत. त्यापैकी काही समश्लोकी आहेत तर काही वेगळे देखील आहेत. या पार्श्वभूमीवर या अनुवादाचे वैशिष्ट्य असे की, हा नुसताच पद्यात नसून गेय अशा पद्यबांधणीत आहे. 'लावण्या छंदानी' अनुवाद हा स्वतः अनुवादकाचाच शब्द आहे. लावणी ही गाण्यासाठीच असते. त्यामुळे विशिष्ट रागातच गायली गेली पाहिजे ही अनुवादकाची शिफारस आहे. त्याचबरोबर समजा संगीताच्या सात सुरांवर नाही गायली तरी चालीत म्हणता यायला पाहिजे. यासाठी हा अनुवाद विशिष्ट लयबद्ध बांधणीत आहे. 'लावणी' ही एक चाल आहे. जशी भूपाळी, अंगाई या चाली आहेत. लावणी या चालीमधे ध्रुवपद, कडवे, अंतरा यांची मात्रांची वेगवेगळी मोडणी असते.

या पद्यबंधांमधे मात्रांची मोजणी महत्त्वाची असल्याने त्यांचा समावेश जाती या प्रकारात येतो. प्रायः यात दोन दोन चरणांची जोडी असते, त्यास द्विपदी म्हणतात. या दोन्ही चरणातील मात्रासंख्या समानच असेल असे नाही. मात्रेचा संबंध ठेक्याशी किंवा लयाशी असतो. हे ठेक्याचं गणित या लावणी रचनांमधे सुबकपणे जुळले असल्यामुळे या रचना साध्या वाचताना सुद्धा ठेक्यात वाचल्या जातात. हेच या रचनांचे बलस्थान आहे.

या एकूण १६ लावण्या असून त्यापैकीच एक सुरवातीचे नमनाचे पद आहे. एक/दोन अपवाद वगळता प्रत्येक लावणीत ४ कडवी आहेत. एखादा अपवाद सोडल्यास अंतरा आहे. ढोबळमानाने कडवी ६/६ चरणांची आणि अंतरा ३ चरणांचा आहे. शेवटी पुन्हा मेळ आहे. या सगळ्या रचनेला एक अंगभूत लय आहे, त्यामुळे या रचनांचे साधे वाचनही लयीतच होते. या पद्यबंधांची चर्चा त्या त्या लावणीच्या विवरणात केली आहे. हे सर्व विश्लेषण एवढ्यासाठी येथे प्रस्तुत केले की, गेय पद्य बांधणे ही फार कठीण गोष्ट आहे. त्यातून हा एक प्रकारे अनुवाद आहे. म्हणजे मूळ आशय जसाच्या तसा हवा, आशयानुरूप गेयता हवी. लावणी हा पद्यबन्ध निवडल्याने, ध्रुवपद, कडवे, अंतरा व मेळ हे ही यथोचित संभाळायला हवे. आपल्याला मुक्तछंदातली कविता वाचायची सवय आहे. पण अभिव्यक्ती अशी कोंदणात बसवली की सुबक आणि

सोज्वळ दिसते आणि मनात अनुनादत राहते, ह्याचे हा लावणी अनुवाद म्हणजे साक्षात् उदाहरण आहे.

या लावण्यांची विभागणी विषयवस्तुनिहाय अध्यायानुसार केली आहे. प्रत्येक अध्यायात पुढील प्रमाणे लावणीसंख्या असून प्रत्येक लावणीच्या सुरवातीला राग आणि ताल यांचाही निर्देश केला आहे.

| अध्याय | लावणी संख्या व कडवी | राग-ताल |
|---|---|---|
| १ | पद १ (कडवी ४) | झिंजोटी जिल्हा – तिताल |
| | लावणी २ (कडवी ४) | कल्याण जिल्हा – तिताल |
| | लावणी ३ (कडवी ४) | गौरी जिल्हा – तिताल |
| | लावणी ४ (कडवी ४) | पीलू जिल्हा – तिताल |
| | लावणी ५ (कडवी ४) | देसकल्याण – तिताल |
| २ | लावणी १ (कडवी ४) | इमनकल्याण – तिताल |
| | लावणी २ (कडवी ४) | देसपीलू जिल्हा – तिताल |
| | लावणी ३ (कडवी ४) | पीलू जिल्हा – तिताल |
| | लावणी ४ (कडवी ४) | पूर्वी जिल्हा – तिताल |
| ३ | लावणी १ (कडवी ४) | देससोरट जिल्हा – तिताल |
| | लावणी २ (कडवी ४) | सारंगगौरी – तिताल |
| | लावणी ३ (कडवी ८) | वृंदावनीसारंग – तिताल |
| ४ | लावणी १ (कडवी ४) | झींजोटीगाराजिल्हा–तिताल |

| | | |
|---|---|---|
| | लावणी २ (कडवी ४) | गौरी जिल्हा – तिताल |
| ५ | लावणी १ (कडवी ४) | कालंगडा जिल्हा – तिताल |
| | लावणी २ (कडवी ४) | परज जिल्हा – तिताल |
| | लावणी ३ (कडवी ४) | सोनी जिल्हा – तिताल |
| | लावणी ४ (कडवी ४) | भूपाळि जिल्हा – तिताल |

यातील अध्याय १,२,३,४ व ५ हे मूळ श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाच्या पूर्वार्धातील अध्याय क्र २९ (रासलीलेचा प्रारंभ), ३० (श्रीकृष्णाच्या विरहात गोपींची अवस्था), ३१ (गोपी गीत), ३२ (भगवंताकडून गोपींचे सांत्वन), आणि ३३ (महारास) या पाचांवर क्रमशः आधारित आहेत.

यापैकी पहिल्या अध्यायातील पद १ हे नमनात्मक आहे. त्यात 'गंगाजल इत्युपनामक केशव भवाब्धिला तरण्यास्तव सदुपाय' म्हणून वर्णन करीत आहे, असे नमूद केले आहे. यानंतर मात्र सलग लावण्या आहेत.

कवीने आपले 'केशव' हे नाव अत्यंत चतुराईने प्रत्येक लावणीत गुंफले आहे, ते असे -

केशववरदश्रीपतिसंनिध येति सकल अबला ।। (अ. १, ला. २, क. २)
करु नका हो असेचि केशववरद प्रभु बोलला।। (अ. १, ला. ३, क. १)
हे केशववरद प्रभूजी होतोचि दासि अबला।। (अ. १, ला. ४, क. ४)
करावया त्या केशववरदश्रीपतिते भक्तिनी।। (अ. १, ला. ५, क. ४)
केशववरद प्रभुचि तिचा येतसे गंध या स्थला।। (अ. २, ला. १, क. ४)

धरि करि ती केशववरदप्रभुवल्लीला।। (अ. २, ला. २, क. ३)

प्रियेसाठी सुमनाचा चय केशववरदप्रभुनी।। (अ. २, ला. ३, क. ३)

विनविति त्या केशववरदश्रीपतिला।। (अ. २, ला. ४, क. ४)

केशववरद प्रभुराया।। (अ. ३, ला. १, क. २)

अस(से) असून केशव वरद प्रभु आम्हाला।। (अ. ३, ला. २, क. ३)

त्या वर्तति केशववरदश्रीपतिच्या भावे करुनि।। (अ. ३, ला. ३, क. ८)

सीतल मृदु वाळूकि केशव वरद प्रभु पावे शोभेला।।(अ. ४, ला. १, क. ३)

वद हे ऐकुन बोले केशव वरद प्रभु इंदिरापती।। (अ. ४, ला. २, क. ४)

धरि बाहुनी ऐशा केशववरदप्रभुसी वनी (अ. ५, ला. १, क. ४)

त्या गाती केशववरदकृष्णभक्तीनी (अ. ५, ला. २, क. ४)

प्रीत जयाचे ठायि सेवितो केशवप्रभु यदुपती।। (अ. ५, ला. ३, क. ३)

धन्य करी त्यां केशववरदाच्युत त्रिलोकाला।। (अ. ५, ला. ४, क. ४)

या प्रत्येक ठिकाणी केशव आणि वरद अशी दोन वेगळी नामे घेतली तर ती कृष्णाशी अन्वित होतीलच आणि त्यामुळे संदर्भास कुठेही ढळ पोचणार नाही. तसेच केशववरद असे सामासिक रूप मानल्यास केशवाला वर देणारा श्रीपती अशा अभिप्रायाने कवीने तो स्वतः केलेला आपला नामोल्लेख ठरतो. एकाच ठिकाणी फक्त वरद शब्द न वापरता केशवप्रभु असे म्हटले आहे. कृष्णाच्या पक्षी ते केशव, प्रभु (स्वामी) असे होईल आणि कवीच्या पक्षी केशवप्रभु (केशवाचा स्वामी) अशा रीतीने अन्वित होईल. प्रस्तुत संपादनात केशव वरद श्रीपती किंवा केशव वरद प्रभू

हे शब्द प्रत्यक्ष संदर्भाकडे लक्ष देऊन संपादित केले आहेत. उदा. (अ. १, ला. ५, क. ४) 'केशववरदश्रीपतिते' या ठिकाणी 'ते' हा विभक्तिप्रत्यय 'केशववरदश्रीपती' अशा एका सामासिक शब्दाला लागला आहे, असे मानणे संदर्भानुरूप होते. केशव वरद असे दोन वेगळे किंवा दोहोंचा एक शब्द धरला तर त्यांच्या अन्वयाला अडचण येईल. पण (अ. ४, ला. १, क. ३) सीतल मृदु वालूकि केशव वरद प्रभु पावे शोभेला।। येथे केशव आणि वरद हेच शब्द विशेष छटा असणारे समानाभिप्रायी शब्द म्हणून मराठीच्या पदविन्यासानुसार वेगवेगळे लिहिता येतात.

**संपादकीय परिष्करणाविषयी –**

मुळातले लेखन शब्द न तोडता सलग केले आहे. त्यामुळे अर्थवाही शब्द वेगवेगळे करून घेणे हे संपादकीय परिष्करणाच्या दृष्टीने आवश्यक होते. याचा एक नमुना मी या ठिकाणी देत आहे.

कवणनारिप्रभुतुझियामोहितमधुरवेणुगायनी।।त्रिलोकीआर्यचालि
पासुनी।।धृ।।नचलेपाहुनतुझ्यात्रिलोकितसौभगरूपाला।।तरुद्विजगोमृगदे
हाला।।उठतीरोमांचहिमोहुनसुरलोकरक्षण्याला।।जसासुरआदिपुरुषजाहला
।।स्पष्टतसाभजजनार्तिहरतूआर्तबंधुधननिला।।ह्मणुनिदेठेउनकरकमला।।
चा०।।अह्मिकिंकरियाच्यातप्तमस्तकीस्तनी।।शुकवदेअसेतद्वचविकलितऐकु
नी।।योगेशप्रभुजोआत्मारामहिवनी।।चा०।।हसुनीमोठ्यानिसदयसुंदरी।।

गोकुलिच्यारमवीचतयाअवसरी।।चा०।।उदारचेष्टितहरीक्षणानीविकसितमुखिकामिनी।। तयाच्यासहीतत्याकाननी।। कवण०।।१।।

प्रस्तुत पुस्तकातील परिष्करण मी माझ्या बुद्धीने केले आहे. जाणकारांच्या सूचनांचे स्वागतच आहे. मुळात प्रत्येक चरण संपल्यावर दोन दंड (।।) टाकले आहेत. कडवे संपल्यावर त्याचा क्रमांक दिला आहे. ध्रुवपद आणि चालबदलासाठी धृ आणि चा० असे संक्षेप वापरलेले आहेत, ते मी तसेच ठेवले आहे.

सदर लावण्यांचे संपादन करताना अर्थवाही शब्दफोड करताना जिथे एखादे अक्षर अनवधानाने गळले गेले असेल असे वाटले तिथे ते चौकटी कंसात घातले आहे. उदा. अ. ४, ला. १, क. ३ येथे नदिरि असा शब्द आहे, तिथे [ति] हे अक्षर घातले आहे. काही ठिकाणी चरणान्तीचे चरणदंड, काही ठिकाणी चा० हे अक्षर मुळात नसताना घातल्यामुळे ते पण चौकटी कंसात घातले आहे.

काही ठिकाणी अनवधानाने चुकीचे अक्षर दिसते. उदा. अ. ३, ला. २, क. १, अंतरा येथे बुधमानोज्ञ असा शब्द आहे. मुळातला श्रीमद्भागवतातील संदर्भ व प्रस्तुत संदर्भ तसेच मराठीची शब्दशैली पाहता हा शब्द 'बुधमनोज्ञ' असा असणे अपेक्षित आहे. अशा प्रकारच्या दुरुस्त्या ( ) अशा गोल कंसाने सुचविल्या आहेत. उदा. बुधमा(म)नोज्ञ. येथे मुळातले तसेच ठेवून सुचविलेली दुरुस्ती गोल कंसात टाकली आहे.

संपादन करताना लावण्यांचे चरण एरवी आपण कवितेची कडवी लिहितो तसे एकाखाली एक लिहिले आहेत. त्यानंतर लावणीचा थोडक्यात गोषवारा देऊन पुढे त्या लावणीचे विवरण केले आहे. विवरणात जिथे आवश्यक तिथे अन्वय, मुळातल्या जशाच्या तशा वापरलेल्या संस्कृत समासांचे विश्लेषण व अर्थ, काही विशेष संकल्पना स्पष्ट करून त्यानंतर श्रीमद्भागवतातील ज्या ग्रंथावर ती लावणी आधारित असेल, तो ग्रंथांश मराठी अनुवादासह प्रस्तुत केला आहे.

शेवटी श्रीमद्भागवतातील श्लोक आणि त्यांचा लावणी संदर्भ तसेच लावणी व तिचा श्रीमद्भागवतातील संदर्भ अशा दोन सूच्या दिल्या आहेत. दोन ठिकाणी मूळ प्रतीतच खाडाखोड झालेली दिसली, तिथे तळटीपेत खोडलेला शब्द देऊन मुख्य ग्रंथात मूळ शब्द ठेवला आहे.

**शैली –**

ज्या ग्रंथांशावर लावणी अधारित आहे, त्यातला पूर्ण आशय त्या लावणीत उतरला आहे. प्रस्तावनेत कवीने या रचनेला संस्कृत व प्राकृत अर्थप्रकाशक पदे असे म्हटले आहे, त्या प्रतिज्ञेचे तंतोतंत पालन त्याने पुढे त्यात केलेले दिसते. कवीच्या भाषेवर संस्कृतचा फार मोठा प्रभाव दिसतो, तो कदाचित विषयाच्या निवडीमुळे आला असावा. पण कित्येकदा संस्कृतातले दीर्घ सामासिक शब्दही जसेच्या तसे घेतलेले आहेत. उदा. निजभक्तकामकल्पद्रुम (अ. ३, ला. १, क. ३),

चपलकुंडलत्विषमंडितगंडा (अ. ५, ला. २, क. १) इ. लावणीच्या विवरणात जिथे जिथे आवश्यक वाटले तिथे तिथे याचे स्पष्टीकरण दिलेले आहे.

या लावण्यांमधील मराठीचे रूप हे दीडशे वर्षांपूर्वीचे आहे. दीडशे वर्षांत मराठी इतकी बदलल्याचे पाहून आपल्यालाही आश्चर्य वाटते. - सी, - नी, प्रति, - करुनि या प्रत्ययांचे किंवा शब्दांचे वापर आपल्या आजच्या मराठीत नाहीत. गोपींना उद्देशून वरचेवर 'अबला' शब्दाचा वापर आणि गोपींनी भगवंताला पतिराया म्हणणे हे आपल्या भाषिकच नव्हे तर सांस्कृतिक पर्यावरणालाही स्वीकारण्यास जरा जड जाते. दीडशे वर्षांपूर्वीची मराठी समाजाची आणि भाषेची स्थिती नीट लक्षात घेतली तरच या कवनांचा आस्वाद घेता येईल. कविता, कवन किंवा पद्य हे गेय असावे किंवा त्याला लय, चाल तसाच एक निश्चित बंध असावा. असा एक अलिखित संकेत होता. त्यामुळे रासपंचाध्यायीवर भाष्य लिहिण्यासाठी लावणीसारखा बंध निवडणे ह्यात अनुवादक म्हणून जसे आव्हान आहे, तसे कवी म्हणूनही आहे आणि एक भक्त म्हणूनही. दीडशे वर्षांपूर्वीपर्यंत लावणी राम जोशी, होनाजी बाळा इ. समर्थ व व्युत्पन्न कवींच्या हातात किंवा लेखणीत होती. या कवींवर केव्हाना केव्हा तरी कीर्तन, पुराण, प्रवचन यांचे संस्कार झालेले असणारच ! आध्यात्मिक लावणी आणि भेदिक लावणी हे लावण्यांचे दोन प्रकारच शाहीराची आध्यात्मिक वृत्ती प्रकट करतात. तरीपण लावणीला आपलं

स्वतःच जग आहेच.  त्या जगातून तिला अलगद् बाहेर काढून भगवंतासमोर नाचायला लावण्याचे अजब कसब इथे पहायला मिळते. या रचनांत यमकाची मांडणी आपले लक्ष वेधून घेते.  ६/६ चरणांमध्येही कवीने यमक जुळविले आहे.

अक्षरांकनाविषयी ध्वनिशास्त्रीय अंगाने विचार करणे मला आवश्यक वाटते.  शीर्षकातील शब्द 'पंच्याध्यायी' पहावा.  असाच एक शब्द 'बाहुच्यालनाने' (अध्याय ५, लावणी १, कडवे ३), असाच विचार करावा असे आणखी काही शब्द - 'इछा', 'मुक्तीछू' इ. संस्कृतमधे च, छ, ज, झ, ञ् हे तालव्य आहेत.  मराठीतही हेच तालव्य आहेत.  चंद्र, छत्री, विजनवास या संस्कृतातून आलेल्या शब्दांत ते आहेत.  पण त्याच बरोबर उर्दूच्या प्रभावातून आलेले व या ध्वनींशी थोडेफार साम्य असणारे असेही ध्वनी आहेत.  चटकन, जहाज, झबले या शब्दात हे उच्चार आढळतात. मुखकुहरातील पुढच्या बाजूला म्हणजे वरच्या हिरड्यांच्या मागच्या बाजूच्या किंचित् वरच्या बाजूला जिभेचा स्पर्श-मोक्ष होऊन हे उच्चार होतात मात्र दोन्ही प्रकारच्या उच्चारांसाठी एकाच प्रकारच्या लिखित चिन्हाची योजना आहे.  (हिंदी भाषेतील हे उच्चारांचे वेगळेपण नुक्ता नावाच्या चिन्हाने दाखविले जाते उदा. ज, ज़).  पंच शब्दात 'च' या चिन्हाचे दोन्ही प्रकारचे उच्चार होऊन दोन वेगळे अर्थ निघतात.  पंच (संस्कृत उच्चार - पृष्ठ तालू, Back palate), अर्थ ५ (पाच ही संख्या) आणि पंच (उर्दूतून आलेला उच्चार पुरः तालू, front palate), अर्थ

परीक्षक उदा. क्रीकेटचा पंच. आता 'च' या एकाच चिन्हाचा संस्कृत पद्धतीचा उच्चार हवा आहे आणि उर्दू नको, यासाठी लेखनशास्त्राच्या दृष्टीने (typography) 'य' ची जोड देण्याची ही युक्ती लेखकाने अवलंबिली आहे. त्यामुळे पंचाध्यायी या शब्दाचा चुकीचा उच्चार होण्याचे टळले. बाहुचालन इथेही 'चा' चा उच्चार 'चारणे' मधल्या 'चा' सारखा होऊ नये तर संस्कृत 'चा' ('चामुण्डा' मधला) सारखा व्हावा म्हणून त्याचे कवीने 'य' युक्त जोडाक्षर योजले आहे.

आता हे एक उदाहरण पहावे. इछेला (अध्याय ४, लावणी १, ध्रुवपद), मुक्तीछू (अध्याय १, लावणी ४, कडवे १), अशा रीतीने जिथे कुठे मराठीतील इच्छा शब्दाची रूपे आलेली आहेत ती सगळी च् छ यांचे जोडाक्षर न करता फक्त एकच 'छ' युक्त घेतली आहेत. याचेही प्रयोजन प्रस्तुत शब्दाच्या मराठी उच्चारवैशिष्ट्याची नोंद घेऊन त्यानुसार त्याचे लिखित रूप दाखविणे, ज्यामुळे अपेक्षित उच्चाराचा शब्द मिळेल, असे दिसते. अनेक लोक इच्छा शब्द पुरःतालू (front palate) या ठिकाणच्या उच्चाराने करतात. इच्छा मधला या लोकांचा उच्चार कच्चा, वत्सा यांच्यातील उच्चाराशी समान ऐकू येतो. हे व्यक्तिगत वैशिष्ट्य आहे. याच्याशी स्त्री, पुरुष, जात, धर्म, प्रादेशिकता, वय यातल्या कशाचाही संबंध नाही. कवीला हाच पक्का मराठी उच्चार अभिप्रेत आहे. त्यासाठी या शब्दाचे संस्कृत उच्चारानुसारी लेखन न स्वीकारता एकच छकार युक्त स्वीकारले असावे असे वाटते.

**या ग्रंथाचे महत्त्व –**

लावणी म्हटल्यावर आपल्या डोळ्यांपुढे आणि कानांवर काही वेगळेच येते आणि जे येते ते अध्यात्मिकता याला फारसे अनुरूप किंवा सुसंवादी नसते. पण त्यातला ठेका, प्रेमासारख्या अत्यंत अन्तःस्थ, नाजूक पण गुंतागुंतीच्या भावनेला थेट हात घालण्याचे सामर्थ्य, आणि उभा/आडवा कसाही छेद घ्यावा, सर्व समाजाच्या मनात कुतूहल निर्माण करून त्याला खेचून आणण्याची ताकद ही लावणीची बलस्थाने पाहता द्वैतातून निघालेली पण पुढे समीपतेतून सायुज्याकडे नेणारी आणि नंतर पुन्हा भक्तीकडे आणणारी (ज्ञानोत्तर भक्ती) रासक्रीडा मांडण्यासाठीच नव्हे तर पोचविण्यासाठी लावणी बंध स्वीकारणे ही अत्यंत प्रशंसनीय गोष्ट आहे. पण यात एक फार मोठे आव्हानही आहे. रास या विषयाचे नीट आकलन झाले नाही तर त्यात निव्वळ शृंगारच दिसायचा आणि लावणी बंध तर जणु शृंगारासाठीच जन्माला आलेला, असे असताना हाच बंध स्वीकारण्यामागे काय हेतू असावा असा मला प्रश्न पडतो. याचं एक उत्तर शेवटच्या लावणीत सापडते ते असे-

जो अनुग्रहासाठी भूतांच्या यादवपती।।
धरि मानुषदेहाते प्राणी ही तत्पर होती।।
ज्या क्रीडा ऐकुनीया करि तैशा क्रीडाप्रती।।

यादवपती कृष्णाने भूतमात्रांवर अनुग्रह करण्यासाठी मनुष्यदेह धारण केला. मात्र ती भूतमात्रे 'तत्पर' म्हणजे 'कृष्णपर' झाली पाहिजेत. एकदा ती कृष्णाकडे वळली, त्याच्या ठायी अनुरक्त झाली तर त्याला त्यांच्यावर अनुग्रह करता येईल. पण ती वळावी कशी ? मग ज्या क्रीडा 'ऐकून' प्राणीमात्र त्याच्याकडे वळतील, 'तत्पर होती' तशा क्रीडा करी ! म्हणजे 'परमप्रेमरूपा भक्ती' शिकविण्यासाठी भगवंतांनीसुद्धा दुसऱ्या कोणत्याही मार्गाचा अथवा माध्यमाचा वापर न करता 'रासक्रीडा' हेच माध्यम निवडले, असा या कवनाचा अभिप्राय आहे. म्हणजे ज्यांना सांगण्यासाठी, शिकविण्यासाठी हा खटाटोप करायचा, त्यांची अभिरुची, क्षमता, कल हे सगळं पाहूनच माध्यम निवडायला हवे. त्यामुळे रासक्रीडेचे विवरण करण्यासाठी अथवा त्यातील भक्तीचे तत्त्वज्ञान सांगण्यासाठी ओवी, आर्या अथवा तत्सम गेय छंदांऐवजी अथवा गद्य प्रबंधाऐवजी कवीने लावणीची निवड केली असावी. श्रीएकनाथ महाराजांनी भारुडे रचली त्यामागेही हीच प्रेरणा असावी.

एकूणच संस्कृत परंपरेत 'सामान्य लोक' या घटकाचा फार विचार केलेला दिसतो. वेद सामान्यांपर्यंत पोचू शकत नव्हते तर वेदांचे प्रतिपाद्य जे आचरणीय आहे, ते परंपरेने पुराणांमार्फत सर्वलोकगामी केले. वैदिक यज्ञ सर्वांसाठी नव्हता मग स्मार्त यज्ञ, तीर्थयात्रा, व्रते, सगुणोपासनादि कर्मांचे पर्याय त्यासाठी उभे राहिले. अवघा नाट्यवेदच

सर्वांना आनंद मिळावा यासाठी प्रकट झाला[1]. तात्पर्य असे की, सामान्य लोकांपर्यंत तत्त्वज्ञान पोचविण्यासाठी माध्यम वा मार्गाचा कधीच हट्टाग्रह किंवा दुराग्रह नव्हता. तत्त्वज्ञान किंवा वेदप्रतिपाद्य धर्म पोचविण्याचा निर्धार मात्र पक्का होता. याच दृष्टीने लावणीबंध कवीने निवडला असावा. केशवराव वासुदेव बापट गंगाजळीवाले कवाडकर ही व्यक्तीसुद्धा वेदशास्त्रपुराणांच्या पठडीतील असावी, त्यामुळेच संस्कृतमधून रासक्रीडा बाहेर काढून लावणीत बसवली तरी त्या शैलीतील संस्कृत बहुलता प्रभावी ठरल्याशिवाय राहत नाही.

कवीने प्रत्येक लावणीसाठी रागांची शिफारस केली आहे. ह्या रागांचे भावजागृतीच्या दृष्टीने काही महत्त्व नक्कीच असणार. माझा तसा अभ्यास नाही. पण जाणकारांनी यावर अवश्य मार्गदर्शन करावे. यातल्या काही रागांच्या बाबतची माहिती प्रसिद्धच आहे. उदा. यमन हा राग आनंद, विरह, शृंगार या भावना प्राधान्याने उद्दीपित करतो. सारंग हा गंभीर प्रकृतीचा राग आहे. झींझोटी हा विरह भावना प्रकाशित करणारा राग आहे. देस व पीलू हे शृंगार प्रधान राग असून पूर्वी व गौरी हे शांतरस प्रधान आहेत, अशी माहिती मला मिळाली. प्रत्येक लावणीला विशिष्ट रागांची आवर्जून शिफारस करण्यामागेही कवीचा हाच विचार

---

[1] सर्वशास्त्रार्थसंपन्नं सर्वशिल्पप्रवर्तकम्। नाट्याख्यं पञ्चमं वेदं सेतिहासं करोम्यहम्।।

एवं संकल्प्य भगवान् सर्ववेदाननुस्मरन्। नाट्यवेदं ततश्चक्रे चतुर्वेदाङ्गसंभवम्।।



भरतमुनिविरचित नाट्यशास्त्र अध्याय १.१५-१६.

असावा की नुसत्या लावणीच्या चालीने व ठेक्याने विपरीत किंवा अवांछित परिणाम होऊ नये ! असो हा संशोधनाचा विषय आहे हे मात्र खरे !

**रासक्रीडा –**

'रास' याविषयी काही लिहावं असा माझा अजिबात अधिकार नाही. पण प्रस्तावनेची शिस्त संभाळण्यासाठी मी हा विषय यथामति येथे मांडत आहे.

ईश्वराला, स्वामी, पिता, माता, शास्ता, सखा, गुरू अशा विविध नात्यांनी अनेकांनी अनुभवले आहे. या प्रत्येक नात्याला दोन कोटी आहेत. त्यातली एक ईश्वर आहे आणि दुसरी दास, मूल, शास्य, सखा, शिष्य अशी ठरते. पण ईश्वर प्रेमच आहे, प्रेमविषय नाही, प्रेममय नाही, फक्त प्रेमच ! यात दुसरी कोटी अशी वेगळी किंवा विरुद्ध नसावी. हे रासक्रीडेमागचे सूत्र असावे. नारदभक्तिसूत्राने भक्तीची व्याख्याच 'सा तु अस्मिन् परमप्रेमरूपा' (नारदभक्तिसूत्र २) अशी करून उदाहरण गोपींचे दिले आहे. देव आणि भक्त यांत प्रेम हेच नाते असल्याने एकदा गोपी कृष्णाकडे येतात तर एकदा कृष्ण गोपींपुढे येतो. एकदा तर गोपीच कृष्ण होतात. 'सोऽहम्' या स्वरूपाचाच हा अनुभव म्हणायचा ! मग त्यातून व्युत्थान पुन्हा कृष्ण दर्शन असा द्वैत-अद्वैत-द्वैत असा हृद्य संतरणाचा अनुभव म्हणजे रास. रास म्हणजे आनंद. ही सगळी क्रीडा आनंदमूलक,

आनंदात्मक आणि आनंदपर्यवसायी अशी असल्याने ह्या अनुभवाचेच नाव रास.

**समारोप –**

एवंच केशवराव वासुदेव बापट गंगाजळीवाले कवाडकर यांचे रासपंच्याध्यायी हे पुस्तक, मराठी भाषेच्या रूपातला एक ऐतिहासिक टप्पा, रासक्रीडेतील हृद्य आध्यात्मिक आनंद सर्वलोकगामी करण्याचा एक प्रमाणिक प्रयत्न आणि मराठी छंदोरचनेचा एक महत्त्वपूर्ण व वैशिष्टपूर्ण प्रयास अशा त्रिविध दृष्टीने महत्त्वाचे आहे.

।।श्रीकृष्णार्पणमस्तु।।

सप्टेंबर २०१९

डॉ. सौ. भाग्यलता पाटसकर
संचालिका,
वैदिक संशोधन मंडळ
(आदर्श संस्कृत शोध संस्था), पुणे

श्री

**श्रीगणेशाय नमः श्रीगुरुभ्यो नमः श्रीराधाकृष्णाय नमः**

**श्रीमद्भागवतदशमस्कंधरासपंच्याध्याय्याः अर्थप्रकाशकानि प्राकृतसंस्कृतमिश्रितानि पदानि विरचये।**

या नमनामध्ये शाहीर त्यांच्या कृतीचे स्वरूप स्पष्ट करीत आहेत. या लावणीरचना म्हणजे श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधातील रासपंचाध्यायीचा (अध्याय २९-३३) अर्थ विशद करण्यासाठी योजलेल्या प्राकृत (म्हणजे मराठी) आणि संस्कृत अशा दोन्ही प्रकारच्या शब्दरचना आहेत.

----------

## अध्याय १, पद १

**राग झिंजोटी जिल्हा.**

**तिताल**

**शिवद वरद श्रीगजवदनाला।।धृ।।**
**श्रीमत्सद्गुरुपदारविंदा श्रीराधारतिपदकमला।।१।।**
**नमुन प्रीतिने व्रजवधुसह श्रीपतिविक्रीडित जे त्याला।।२।।**
**हरिसेवक गंगाजल इत्युपनामक केशव भवाब्धिला।।३।।**
**तरण्यास्तव सदुपाय समजुनी वर्णन करि श्रीमुनि वदला।।४।।**

**विवरण –**

हे प्रस्तावनेचे पद असून ध्रुवपद आणि ४ कडवी अशी याची रचना आहे. यात शाहीराने गजाननाला, सद्गुरुला आणि श्रीकृष्णाला नमन केले आहे.

'व्रजवधूसह श्रीपतिविक्रीडित, त्याला प्रेमाने नमून' असे सांगून मुख्य विषयाचा उपन्यास केला आहे. गोपी-कृष्णांचा रास हा भक्तीचा विषय आहे, मानवी शृंगाराचा नाही हे यातून स्पष्ट होते.

दुसऱ्या कडव्यात गंगाजल इति उपनामक केशव असे म्हणून शाहीराने स्वतःचे नाव सूचित केले आहे. केशवराव वासुदेव बापट गंगाजळीवाले कवाडकर असे त्यांचे नाव त्यांनी पुस्तकाचा कर्ता म्हणून छापले आहे. भवाब्धीला तरण्याचा एक चांगला उपाय म्हणून हे वर्णन करीत असल्याचे त्यांनी म्हटले आहे. 'श्रीमुनि वदला' हा 'श्रीशुक उवाच' या मुळातल्या शब्दांचा अनुवाद असून त्याचा संबंध पुढील लावणी दोनशी आहे.

----------

## अध्याय १, लावणी २

**रागकल्याणजिल्हा.**

**तिताल.**

**सुमनप्रफुल्लित शरदऋतूच्या पाहुनि त्या रात्रिला ।।**
**हरि हि रमाया निजमायाश्रय मनि करिता जाहाला ।।धृ।।**
**सुखदकरे शशि पूर्वदिशामुख अरुणानी लिंपुनी।।**
**तदा उदय पावला प्रजेच्या शोकाते शमउनी।।**
**जसा प्रियेला दीर्घदर्शन प्रेयस शुच निरसुनी।।**
**रमाननद्युति अखंडमंडल नभी उडुगणानी।।**



**आवृत नवकुंकुमवत अरुणा राकेशा पाहुनी।।**

तन्मृदुकिरणे रंजित गहनासि ही नंदसूनुनी।।
चा०।। कामिनीमना जे हरी।।
त्या मधुर गायना करी।।
सकलही गोष्ठसुंदरी।।
चा०।। श्रीकृष्णानी मन हरिलेल्या परस्पर हि आपुला।।
उद्यम समजु न देति अशा त्या जवचंचलकुंडला।।सुमन।।१।।
अनंगवर्द्धन करी असे जे गीत तया ऐकुनी।।
जिथे असे तो कांत तया स्थलि त्या पोचति येऊनी।।
कोणि दोहिता टाकुन दोहन उत्सुक मनि होऊनी।।
येति तापउनि पय संयावा उतरिता न टाकुनी।।
येति सुताना दुग्ध पाजिता वाढण्यासि त्यागुनी।।
पतिशुश्रूषण तसे अशन करिता हि किती सोडुनी।।
चा०।। भोजना लिंपिता किती।।
झाडीता इतर ही सती।।
अंजिता लोचनाप्रती।।
चा०।। सोडुन कोणी विपरित घालून वसनाभरणाला।।
केशववरदश्रीपतिसंनिध येति सकल अबला।। सुमन.।।२।।
भ्रातृबंधुनी तातपतीनी निवारिता ज्या सती।।
गोविंदे मन हरिलेल्या त्या मोहूनि न पर्तती।।
अलब्धनिर्गम अंतर्गृहगत अशा गोपिका किती।।
तद्भावेयुत नेत्र लाउनी करिती ध्यानाप्रती।।

**श्रीपतिते दुःसह प्रेष्ठविरहजातितापे धुती।।**
**अशुभा ध्याने मिळता हरि परिरंभणसुख शमविती।।**
**चा०।। पुण्या त्या हरिसि च सती।।**
**विटमतिने ही संगती।।**
**करुनिया बंधनाप्रती।।**
**चा०।।क्षीण करुनि तत्काल टाकिती गुणमयदेहाला।।**
**नृप बोले त्या मुने जाणती सुंदर पति हरिला।।सुमन।।३।।**
**ब्रह्म न गुणधी असुन गुणाचा ओघ शांत जाहला।।**
**कसा तयांचा सांगा ऐसे ऐकुन शुक बोलला।।**
**पहिले कथिले असेचि गेला चैद्य जसा सिद्धिला।।**
**द्वेषे हरिसी हरिप्रिया का जाति न त्या गतिला।।**
**निर्गुणसगुणाव्ययानंत हरि भगवद्भवमंगला।।**
**जनाचिया नृप असे क्रोध भय भक्ति स्नेहाला।।**
**चा०।। कामैक्या ऐशा प्रती।।**
**हरिठायी नित्य करती।।**
**तन्मयता ते पावती।।**
**चा०।। अज भगवद्योगेशराज हरि विषइ विस्मयाला।।**
**अशा न करि तू ज्याचे योगे तरे जग भवाला।। सुमन.।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील १-१६ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

शरदऋतूतील प्रफुल्लित रात्री आपल्या योगमायेच्या बळावर भगवंताने क्रीडा करण्याचा संकल्प केला. पूर्व दिशेला तांबूस रंगाचे अखंड मंडलाकार चंद्रबिंब उदयास आले. त्याच्या कोमल किरणांनी वृंदावन न्हाऊन निघाले. हे पाहून भगवंताने आपला वेणू वाजविला आणि त्या नादाने मोहित होऊन, आपापल्या हातातली कामे टाकून जिथे भगवंत होता तिथे सर्व गोपी धावत पळत निघाल्या. त्यांनी वस्त्रे व आभूषणे सुद्धा उलटीपालटी घातली होती. भाऊ, वडील, पती, नातेवाईक यांनी आडविले तरी त्या तशाच पुढे निघाल्या.

ज्यांना घरातून बाहेर पडता आले नाही त्यांनी डोळे मिटून घेतले आणि ध्यानात त्या भगवंताला आलिंगन दिले. त्या भगवत्स्पर्शाने त्यांची सर्व बंधने (कर्मपाश) गळून पडली आणि त्यांनी आपल्या सगुण देहाचा त्याग केला (त्या मुक्त झाल्या).

परीक्षित राजाने शुक मुनींना विचारले, 'भगवंताला त्या गोपींनी आपला सुंदर पती म्हणून जाणले, निर्गुण ब्रह्म म्हणून नाही तरी त्यांचा त्रिगुणरूप प्रपंच शांत कसा झाला ?'

यावर शुकमुनी म्हणाले, 'मी तुला आधीच सांगितले होते की, शिशुपालाने अत्यंत द्वेषाने का होईना सतत भगवंताचे ध्यानच केले त्यामुळे तो तरून गेला. मग या तर गोपी मुळातच हरिच्या प्रिय आहेत मग त्यांना का नाही मिळणार मुक्ती ? क्रोध, भय, भक्ती, काम, कोणत्याही कारणाने जे भगवंतास सतत मनात ठेवतात ते भगवंताशी तन्मय पावतात.

योगेश्वर, अज अशा भगवंता विषयी तू अशी शंका घेऊ नकोस म्हणजे तू ही भवाब्धी तरशील.'

**विवरण –**

- अन्वयाच्या दृष्टीने पहिल्या कडव्यातील 'नंदसूनुनी' या चरणातील पदाचा अन्वय अंतऱ्यातील 'त्या मधुर गायना करी' याकडे आहे. मात्र नंदसूनुनी ही तृतीया केवळ लिंपुनी। शमउनी। निरसुनी। उडुगणानी। पाहुनी यांच्याशी यमक जुळविण्यासाठी असावी.
- 'सकलही गोष्ठसुंदरी' या अंतऱ्यातील चरणाचा अन्वय मेळातील 'उद्यम समजु न देति' या ओळीशी आहे.
- उडुगणानी - नक्षत्रांनी
- राकेशा पाहुनी - चंद्राला पाहून
- गोष्ठसुंदरी - व्रजातल्या सुंदर स्त्रिया, गवळणी
- जवचंचलकुंडला – वेगाने (धावल्यामुळे) ज्यांची कुंडले (लोंबणारे कर्णभूषण) हालत आहेत अशा.
- दुसऱ्या कडव्यातील चौथ्या चरणापासून अन्वय -

  पय तापउनि संयावा न उतरता येति. सुतांना दुग्ध पाजिता (सुतांना) टाकुनी येती. पतिशुश्रूषण, तसे अशन करिताही (त्यास) त्यागुनी येती. भोजना सोडुनी येती. किती लिंपिता सोडुन येती. इतर सती झाडीता सोडुन येती. लोचनाप्रती अंजिता सोडुन येती.
- संयाव - तापत्या दुधावर गोळा झालेली साय.
- अंजिता - काजळ घालता घालता.
- पर्तति - परत जाती.
- अलब्धनिर्गम - (घरातून) बाहेर पडण्याचा मार्ग किंवा अवसर ज्यांना मिळाला नाही अशा.



- तिसऱ्या कडव्यातील अन्वय-

तद्भावेयुत नेत्र लाउनी श्रीपतिते ध्यानाप्रती करिती. दुःसह प्रेष्टविरहज अतितापे अशुभा धुती.

हरि ध्याने मिळता परिरंभणसुख शमविती.

- तिसऱ्या कडव्यातील अंतऱ्याचा अन्वय -

  त्या पुण्या सती विटमतीने हरिसि संगती करुनिया, बंधनाप्रती क्षीण करुनि गुणमय देहाला तत्काळ टाकिती.

- निर्गुणसगुणाव्ययानंत - निर्गुण, गुणात्मक, अव्यय आणि अनंत असा (हरी)

- चौथ्या कडव्यातील मेळाचा अन्वय -

  ज्याचे योगे जग भवाला तरे अशा अज भगवद् योगेशराज हरि विषइ तू (अशा) विस्मयाला न करी.

या लावणीत ध्रुवपदासह एकूण ४ कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात सयमक असे ६ चरण आहेत. त्यानंतर ३ चरणांचा एक अंतरा व पुढे दोन चरणांचा मेळ आहे. अंतरा व मेळ दोन्ही यमक युक्त आहेत व त्यांच्या सुरवातीला त्यांच्या चाल बदलासाठी 'चा०' असे अक्षर टाकून चाल बदलाची सूचना केली आहे. प्रत्येक चरणानंतर ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना त्यातील पहिली तीन अक्षरे (सुमन) आवृत्त करून केली आहेत.

या पद्याच्या ध्रुवपदाची द्विपदी लवंगलता या जातीची असून तिच्या प्रत्येक पादाची मात्रासंख्या २८ आहे. प। प। प। दोन मात्रा । दोन मात्रा। अशी ही मोडणी आहे. येथे प म्हणजे ८ / ८ मात्रांचे आवर्तन असून त्याला पद्मावर्तनी असे म्हणतात.

पुढे सहा ओळींचे एक कडवे असून त्याच्या प्रत्येक ओळीत २७ मात्रा आहेत. सूर्यकांत किंवा समुदितमदना नावाची ही जाती असून प। प।

प। एकमात्रा। दोन मात्रा। अशी तिची मोडणी आहे. याला अपवाद फक्त चौथ्या ओळीचा, जिची मात्रासंख्या २६ आहे. ही चंद्रकांत किंवा पतितपावन जाती आहे. प। प। प। दोन मात्रा। अशी या एकाच ओळीची वेगळी मोडणी आहे. आत्तापर्यंत पद्मावर्तनी जातीच्या आवर्तनामुळे आलेली विशिष्ट लय / चाल पुढे अंतऱ्यात बदलते. हा अंतरा त्रिपदीचा असून १३ मात्रांची प्रत्येक ओळ आहे. दोनमात्रा। प। एकमात्रा। दोन मात्रा। अशी मोडणी आहे. यानंतर पुन्हा कडवे संपेपर्यंत दोन चरणांचा, प्रत्येकी २७ मात्रांचा सूर्यकांत जातीचा मेळ असून तो ध्रुवपदाशी सयमक आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील १-१६ श्लोक (अर्थासहित) असे –

**।।श्रीशुक उवाच।। भगवानपि ता रात्रीः शरदोत्फुल्लमल्लिकाः।।**
**वीक्ष्य रन्तुं मनश्चक्रे योगमायामुपाश्रितः।।१।।**

शरद ऋतूतल्या, मोगऱ्याची फुले उमललेल्या त्या रात्री पाहून, योगमायेचा आश्रय करून क्रीडा करण्याचा भगवंतानी संकल्प केला.

**तदोडुराजः ककुभः करैर्मुखं प्राच्या विलिम्पन्नरुणेन शंतमैः।।**
**स चर्षणीनामुदगाच्छुचो मृजन्प्रियः प्रियाया इव दीर्घदर्शनः।।२।।**

दीर्घकाळाने भेटणाऱ्या प्रियकराने आपल्या हाताने प्रियेच्या मुखाला (केशराचा) लेप लावून तिचा विरहताप दूर करावा, त्याप्रमाणे चंद्र पूर्व

दिशेचे मुख आपल्या सुखकारक किरणांनी तांबूस रंगाने विलेपित करीत उगवला.

**दृष्ट्वा कुमुद्वन्तमखण्डमण्डलं रमाननाभं नवकुङ्कुमारुणम्।।**
**वनं च तत्कोमलगोभिरञ्जितं जगौ कलं वामदृशां मनोहरम्।।३।।**

लक्ष्मीच्या मुखासारखे तेज असणारे, ताज्या केशरासारखे तांबूस असे पूर्ण चंद्रबिंब आणि त्याच्या कोमल किरणांनी उजळलेले वन पाहून श्रीकृष्ण आपल्या वेणूतून व्रजसुंदरींना मोहून टाकणारे मंजूळ स्वर वाजवू लागले.

**निशम्य गीतं तदनङ्गवर्धनं व्रजस्त्रियः कृष्णगृहीतमानसाः।।**
**आजग्मुरन्योन्यमलक्षितोद्यमाः स यत्र कान्तो जवलोलकुण्डलाः।।४।।**

प्रेमवर्धक असे ते गीत ऐकून ज्यांचं मन कृष्णाने आकृष्ट केले आहे अशा, एकमेकींचे उद्योग कळवूनही न घेता, वेगाने आल्यामुळे ज्यांची कुंडले हालत आहेत अशा त्या व्रजातल्या स्त्रिया जिकडे तो प्रिय होता, तिकडे येऊन पोचल्या.

**दुहन्त्योऽभिययुः काश्चिद्दोहं हित्वा समुत्सुकाः।।**
**पयोऽधिश्रित्य संयावमनुद्वास्यापरा ययुः।।५।।**

गाईचे दूध काढणाऱ्या काही जणी दोहन सोडून मोठ्या असोशीने आल्या, तर दूध तापविणाऱ्या काही जणी उतू जाणारं दूध शांत न करता तशाच आल्या.

**परिवेषयन्त्यस्तद्धित्वा पाययन्त्यः शिशून्पयः।।**
**शुश्रूषन्त्यः पतीन्काश्चिदश्नन्त्योऽपास्य भोजनम्।।६।।**

जेवायला वाढणाऱ्या ते सोडून देऊन, आपल्या लहानग्यांना दूध पाजणाऱ्या ते अर्धवट टाकून, पतीची सेवा करणाऱ्या काही ती पतिसेवा टाकून देऊन तर जेवणाऱ्या कुणी ते सोडून देऊन आल्या.

**लिम्पन्त्यः प्रमृजन्त्योऽन्या अञ्जन्त्यः काश्च लोचने।।**
**व्यत्यस्तवस्त्राभरणाः काश्चित्कृष्णान्तिकं ययुः।।७।।**

काही जणी स्वतःला उटी लावीत होत्या, काही जणी (लावलेली उटी) धुवून काढीत होत्या, काहीजणी डोळ्यांत अंजन घालीत होत्या, काहींची वस्त्रे व आभूषणे उलट सुलट झाली होती, अशा त्या सगळ्या कृष्णाच्या जवळ आल्या.

**ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृबन्धुभिः।।**
**गोविन्दापहृतात्मानो न न्यवर्तन्त मोहिताः।।८।।**

पती, वडील, भाऊ तसेच अन्य नातेवाईक यांच्याकडून त्या आडवल्या जात होत्या पण तरीही कृष्णानेच मन आकृष्ट केल्यामुळे त्या परत घरी फिरकल्या नाहीत.

**अन्तर्गृहगताः काश्चिद्गोप्योऽलब्धविनिर्गमाः।।**
**कृष्णं तद्भावनायुक्ता दध्युर्मीलितलोचनाः।।९।।**

घराच्या आतल्या भागात असलेल्या, बाहेर पडणं शक्य न झालेल्या काहींनी डोळे मिटले आणि श्रीकृष्णाचे ध्यान केले.

**दुःसहप्रेष्ठविरहतीव्रतापधुताशुभाः।।**
**ध्यानप्राप्ताच्युताश्लेषनिर्वृत्या क्षीणमङ्गलाः।।१०।।**

आपल्या प्रिय व्यक्तीच्या असह्य विरहामुळे, निर्माण झालेल्या तीव्र दुःखामुळे त्यांचे सर्व पाप धुतले गेले. आणि ध्यानामधे भेटलेल्या कृष्णाच्या आलिंगनाच्या सुखामुळे त्यांचे पुण्य ही क्षीण झाले.

**तमेव परमात्मानं जारबुद्ध्यापि सङ्गताः।।**

**जहुर्गुणमयं देहं सद्यःप्रक्षीणबन्धनाः।।११।।**

जारबुद्धीने असून सुद्धा परमात्म्याशी मीलन पावलेल्या, सर्व कर्मांचे पाश तुटून पडलेल्या त्या गोपींनी लगेचच आपला त्रिगुणात्मक देह टाकला.

**राजोवाच।।कृष्णं विदुः परं कान्तं न तु ब्रह्मतया मुने।।**

**गुणप्रवाहोपरमस्तासां गुणधियां कथम्।।१२।।**

परीक्षितराजा म्हणतो (गोपी) कृष्णाला अत्यंत प्रिय असा पती मानत होत्या, ब्रह्म म्हणून जाणत नव्हत्या. तर मग त्रिगुणात्मक बुद्धी असणाऱ्या त्यांच्या त्रिगुणांचा ओघ शांत कसा झाला ?

**श्रीशुक उवाच।। उक्तं पुरस्तादेतत्ते चैद्यः सिद्धिं यथा गतः।।**

**द्विषन्नपि हृषीकेशं किमुताधोक्षजप्रियाः।।१३।।**

श्री शुक म्हणाले, हे तर तुला पूर्वीच सांगितले होते की कृष्णाशी शत्रुत्व करणारा शिशुपालही मोक्षास गेला, मग कृष्णाला प्रिय मानणाऱ्या आणि कृष्णाच्या प्रिय असणाऱ्या गोपींची काय कथा ?

**नृणां निःश्रेयसार्थाय व्यक्तिर्भगवतो नृप।।**

**अव्ययस्याप्रमेयस्य निर्गुणस्य गुणात्मनः।।१४।।**

हे राजा ! अविनाशी, ज्याचे यथार्थ ज्ञान होणे केवळ अशक्य, निर्गुण आणि त्रिगुणांचा म्हणजे त्रिगुणात्मिका मायेचा स्वामी , अशा भगवंताचे प्रकट होणे हे माणसाच्या मोक्षासाठीच असते.

**कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेव च।।**

**नित्यं हरौ विदधतो यान्ति तन्मयतां हि ते।।१५।।**

इच्छा, राग, भीती, प्रेम, ऐक्य आणि मैत्री ही सर्व भगवंताच्या ठिकाणी ठेवणारे खरोखर त्याच्याच स्वरूपाला प्राप्त होतात.

**न चैवं विस्मयः कार्यो भवता भगवत्यजे।।**

**योगेश्वरेश्वरे कृष्णे यत एतद्विमुच्यते।।१६।।**

जन्मरहित, योगेश्वरांमध्येही श्रेष्ठ असणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांच्या बाबतीत तुला असा अचंबा वाटायला नको. कारण ज्याच्यामुळे हा भावबन्ध सुटतो.

----------

## अध्याय १, लावणी ३

**राग गौरी जिल्हा.**

**तिताल.**

**जवळ आलेल्या व्रज अबला।।**

**त्याते पाहुन वदणाऱ्यांत श्रेष्ठ हरी बोलला।।धृ।।**

**वचनच्यातुर्ये मोहूनी।।**

**वरेचि केले तुह्मि महाभागा येणे ललनानी।।**

**काय करु तुमचे प्रिय गहनी।।**

**वदा व्रजाचे अनामय कि आगमनहेतु जलदिनी।।**

**निषेवित भयकर सत्वानी।।**

**घोर रूप या ऐशा रात्रित जावे व्रजि येथुनी।।**

चा०।। ठरु नये सुमध्यमा नारिनी।।
पुत्र पति बंधु पितर जननी।।
तुह्मा प्रति शोधिती न पाहुनी।।
चा०।। होतिल दुःखित सदनाला।।
करू नका हो असेचि केशववरद प्रभु बोलला।।
जवळ आलेल्या व्रज अबला।।
त्याते पाहुन वदणाऱ्यांत श्रेष्ट हरी [बोलला]।।१।।
यमुनानिल लीले करुनी।।
कंपित तरुपल्लवशोभित कुसुमित शशिकिरणानी।।
सुशोभित अशा वना नयनी।।
निरीक्षिले गोष्ठा प्रति जावे तुह्मि आता जलदिनी।।
करावी पतिसेवा सतिनी।।
वत्सबालही क्रंदति त्यांते पाजावे दोहुनी।।
चा०।। अथवा तुह्मि मोहित होउनी।।
आला माझे स्नेहानी।।
उक्तचि तुह्मि केले सतिनी।।
चा०।। करिति मज ठायी प्रीतीला।।
सकल हि जंतू ह्मणूनि जावे त्वरित गोकुलाला।। जवळ०।।२।।
असे पर धर्मचि वनितांला।।
निष्कपटे कल्याणी पतितद्बंधूसेवेला।।
तैसे प्रजा पालनाला। करणे दुःशील वृद्ध दुर्भग निर्धनि रुग्णि असला।।

**जड हि तरि अपातकी पतिला।।**

**सोडु नये लोकेप्सु वधूनी उपपति जरि केला।।**

**चा०।। तरि सर्वत्रचि निंदेते।।**

**दुरितकरि बहुतचि भीतीते।।**

**दे अस्वर्ग्यचि अयशाते।।**

**चा०।। जशा पावाल तुह्मी सकला।।**

**ध्यानदर्शनश्रवणकीर्तने मज ठायी भक्तिला।।जवळ०।।३।।**

**तशा संगानि न जा सदनी।।**

**श्रीशुक बोले गोविंदाचे विप्रिय वच गोपिनी।।**

**असे ऐकून विषादानी।।**

**अति दुरत्यय चिंता पावति भग्नकाम होउनी।।**

**मानसि शोक श्वसनानी।।**

**शुष्कचि झालेल्या बिंबाधर मुखा खालि लवउनी।।**

**चा०।। उकरती पदे करुन अवनी।।**

**धुवुनि त्या कज्जलयुत अश्रुनी।।**

**पुसति कुचकुंकुमही होउनी।।**

**चा०।। अतिशय दुःखित व्रज अबला।।**

**स्तब्ध राहिल्या त्याचे विरहे करूनिया सकला।। जवळ०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील १७-२९ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

गोपी आलेल्या पाहून कृष्ण त्यांना म्हणाला, 'मी तुमचे काय प्रिय करू ? व्रजात सगळे कुशल आहे ना ? रात्रीच्या वेळी तुमच्या सारख्यांनी इथे थांबू नये. तुमच्या घरचे तुम्हाला शोधत असतील. हे वन, ही फुललेली झाडे सर्व पाहून झाले ना ? मग आता घरी जा. पतीची आणि सासरच्यांची सेवा करणे हा सतीधर्म आहे. पतीला सोडणे हे अपकीर्ती करणारे असते. माझ्या ध्यानाने, दर्शनाने, श्रवणाने, कीर्तनाने जशा तुम्ही माझ्या भक्तीला पावाल, तशा संगाने नाही.' कृष्णाचे हे विरस करणारे बोलणे ऐकून गोपी दुःखी झाल्या. मुकाट्याने मान खाली घालून अंगठ्याने जमीन उकरू लागल्या. अश्रुपाताने त्यांची छातीवरची केशराची उटी पुसली जाऊ लागली.

**विवरण –**

- निषेवित सत्वानी – भयंकर प्राण्यांनी मुक्काम केलेले.

  सुमध्यमा - नाजूक कंबर असलेली, सुंदर

  लोकेप्सु - लोक-स्वर्गलोकाची अपेक्षा असणारी

  गोष्ठ – व्रज, गैळवाडा

  जलदिनी - जलद गतीने/त्वरेने याअर्थी

  पहिले कडवे संपल्यानंतर ध्रुवपद पूर्ण आवृत्त केले आहे.

दुसऱ्या कडव्याचा अन्वय

- शशिकिरणानी सुशोभित अशा वना, तुह्मि नयनी निरीक्षिले. आता तुम्हि जलदिनी गोष्ठाप्रति जावे.
- करिति मज ठायी प्रीतीला सकलहि जंतू म्हणूनि



- हे कल्याणी, निष्कपट पतितद्बंधूसवेला, तसे प्रजापालनाला करणे.

- दुःशील वृद्ध दुर्भग निर्द्धनि रुजि जड हि तरि अपातकी पतिला लोकेप्सु वधूनी सोडू नये.
- जशा तुम्ही सकला ध्यान दर्शन श्रवण कीर्तने मजठायी भक्तिला पावाल तशा संगानि न.

चौथ्या कडव्यातील अन्वय

- विषादानी भग्नकाम होउनी मानसी अति दुरत्यय चिंता शोक पावती.
- श्वसनानी शुष्कचि झालेल्या बिंबाधर मुखा खालि लवउनी पदेकरुन अवनी उकरती.

या लावणीत ध्रुवपद व एकूण चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात ६ चरण, तीन चरणांचा अंतरा आणि पुन्हा दोन चरणांचा मेळ आहे. नंतर ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना आहे. आणि हे सर्व सयमक आहे.

चरणांपैकी पहिला, तिसरा, पाचवा हे अखुड आहेत आणि त्यांच्या जोडीचे अनुक्रमे दुसरा, चौथा व सहावा हे दीर्घ आहेत. हीच रचना मेळाच्या दोन चरणातही आहे.

प्रा. माधव पटवर्धन यांच्या छन्दोरचना या पुस्तकातील जातिजृम्भण या प्रकरणावर आधारित मी लावण्यांमधील छंदांचे विश्लेषण केले आहे. विविध मात्रासंख्या असणाऱ्या जातींची नावे व त्यांची मोडणी या ग्रंथात दिली आहे. पण या लावण्यांमधील मात्रांचे रचनाबंध तसेच्या तसेच त्यात बसतीलच असे नाही. उदा. लावणीतील एखादा १५ मात्रांचा चरण भुवनसुंदर जातीचा वाटला तरी दुसरा तसा असतोच असे नाही. खेरीज २६,२८ इ. मात्रांचे असंख्य रचनाबंध होतील. त्यामुळे इथून पुढच्या

लावण्यांच्या रचनाविश्लेषणात नाव न देता नुसते मात्रांचे विश्लेषणच दिले आहे. मराठी छन्दोरचनेच्या दृष्टीने याचा विशेष अभ्यास व्हावयास हवा.

या लावणीतील ध्रुवपदाची द्विपदी विषम मात्रांची असून पहिल्या चरणात १५ मात्रा आहेत. ⌣ ⌣ ⌣ – |प |–| अशी ही मोडणी आहे. दुसऱ्या चरणात २६ मात्रा आहेत. प|⌣ ⌣ – – ⌣ – ⌣|प| अशी ही मोडणी आहे. २६ मात्रांच्या प्रसिद्ध जातींच्या तुलनेत ही रचना शिथिल आहे.

कडव्याची द्विपदीही विषम मात्रांची आहे. (अनुक्रमे १५ व २७ मात्रा). पहिल्या चरणाची मोडणी ⌣ ⌣ ⌣ –|प|–| अशी दिसते आणि दुसऱ्या चरणाची मोडणी प|⌣ ⌣ ⌣ – – –|प|–| अशी दिसत आहे. अंतऱ्याच्याही १६ मात्रा असून त्याची मोडणी ⌣ ⌣ ⌣ –|प|⌣ – अशी दिसत आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील १७-२९ श्लोक (अर्थासहित) असे –

**ता दृष्ट्वान्तिकमायाता भगवान्व्रजयोषितः।।**

**अवदद्वदतां श्रेष्ठो वाचः पेशैर्विमोहयन्।।१७।।**

त्या गोकुळातील स्त्रिया जवळ आलेल्या पाहून वक्त्यांमधे श्रेष्ठ असणारे भगवंत वाणीच्या सौंदर्याने मोहवीत म्हणाले.

**श्रीभगवानुवाच।। स्वागतं वो महाभागाः प्रियं किं करवाणि वः।।**

**व्रजस्यानामयं कच्चिद्ब्रूतागमनकारणम्।।१८।।**

भगवंत म्हणाले – महाभाग्यशाली सुंदर स्त्रियांनो ! तुमचे स्वागत असो ! मी आपले काय प्रिय करावे ? गोकुळाचे सर्व कुशल आहे ना ? इथे येण्याचे काय कारण, सांगा !

**रजन्येषा घोररूपा घोरसत्त्वनिषेविता।।**

**प्रतियात व्रजं नेह स्थेयं स्त्रीभिः सुमध्यमाः।।१९।।**

मोठमोठे प्राणी जिच्यात वावरत असतात, अशी ही भयंकर रात्र आहे, इथे स्त्रियांनी थांबू नये ! तुम्ही गौळवाड्यात परत जा.

**मातरः पितरः पुत्रा भ्रातरः पतयश्च वः।।**

**विचिन्वन्ति ह्यपश्यन्तो मा कृध्वं बन्धुसाध्वसम्।।२०।।**

तुम्ही दिसत नसल्यामुळे तुमचे आई, वडील, मुले, भाऊ आणि पती तुम्हाला शोधत असतील. आप्तांना अशी काळजी लावू नका.

**दृष्टं वनं कुमुदितं राकेशकररञ्जितम्।।**

**यमुनानिललीलैजत्तरुपल्लवशोभितम्।।२१।।**

लाल रंगांची कमळे असणारे, पूर्ण चंद्राच्या किरणांनी माखलेले, यमुनेवरच्या वाऱ्याने नाजूकपणे हलणाऱ्या कोवळ्या पालवीमुळे सुंदर दिसणारे वन तुम्ही पाहिलेत.

**तद्यात मा चिरं गोष्ठं शुश्रूषध्वं पतीन्सतीः।।**

**क्रन्दन्ति वत्सा बालाश्च तान्पाययत दुह्यत।।२२।।**

हे साध्वी स्त्रियांनो ! तर (तुमच्या) गौळवाड्यात परत जा. उशीर करू नका. आपापल्या पतीची सेवा करा. वासरे हंबरत असतील, लहान मुले रडत असतील, त्यांना पाजा. गाईंच्या धारा काढा.

**अथवा मदभिस्नेहाद्भवत्यो यन्त्रिताशयाः।।**

**आगता ह्युपपन्नं वः प्रीयन्ते मयि जन्तवः।।२३।।**

किंवा माझ्यावरील प्रेमामुळे तुमचे मन (माझ्याकडे) ओढले गेल्याने तुम्ही आलात ! हे तुमच्या बाबतीत योग्यच आहे. सगळे प्राणिमात्र माझ्यावरच प्रेम करतात.

**भर्तुः शुश्रूषणं स्त्रीणां परो धर्मो ह्यमायया।।**

**तद्बन्धूनां च कल्याण्यः प्रजानां चानुपोषणम्।।२४।।**

हे कल्याणकारी स्त्रियांनो ! निष्कपटपणे पतीची सेवा करणे, त्याच्या आप्तांचे कल्याण करणे आणि मुलाबाळांचे पालन पोषण करणे हाच स्त्रियांचा खरा धर्म आहे.

**दुःशीलो दुर्भगो वृद्धो जडो रोग्यधनोऽपि वा।।**

**पतिः स्त्रीभिर्न हातव्यो लोकेप्सुभिरपातकी।।२५।।**

स्वर्गाची इच्छा करणाऱ्या स्त्रियांनी आपला पती जरी दुर्वर्तनी, दुर्दैवी, वृद्ध, मंदमती, रोगी आणि निर्धन असला पण पापी नसला तर त्याचा त्याग करू नये !

**अस्वर्ग्यमयशस्यं च फल्गु कृच्छ्रं भयावहम्।।**

**जुगुप्सितं च सर्वत्र औपपत्यं कुलस्त्रियाः।।२६।।**

कुलीन स्त्रीने जार संबंध ठेवणे हे स्वर्गप्राप्तीला प्रतिबंधक, अपकीर्ती करणारे, क्षुद्र, दुःखदायक, भयकारी आणि सर्वत्र गर्हणीय असे आहे.

**श्रवणाद्दर्शनाद्ध्यानान्मयि भावोऽनुकीर्तनात्।।**

**न तथा संनिकर्षेण प्रतियात ततो गृहान्।।२७।।**

माझ्या (लीला) श्रवणामुळे, (मला) पाहिल्यामुळे, माझ्या गुणसंकीर्तनांने माझ्या ठिकाणी जशी भक्ती जडते तशी माझ्या साक्षात् स्पर्शाने नाही. म्हणून तुम्ही घरी निघून जा.

**श्रीशुक उवाच।। इति विप्रियमाकर्ण्य गोप्यो गोविन्दभाषितम्।।**
**विषण्णा भग्नसंकल्पाश्चिन्तामापुर्दुरत्ययाम्।।२८।।**

श्री शुक म्हणाले - कृष्णाचे असे कटू बोलणे ऐकून, मनोरथ भग्न झालेल्या दुःखित अशा या गोपींना घोर काळजी लागून राहिली.

**कृत्वा मुखान्यव शुचः श्वसनेन शुष्यद्-**
**बिम्बाधराणि चरणेन भुवं लिखन्त्यः।।**
**अस्त्रैरुपात्तमषिभिः कुचकुङ्कुमानि**
**तस्थुर्मृजन्त्य उरुदुःखभराः स्म तूष्णीम्।।२९।।**

खूप दुःख झालेल्या, शोकामुळे (झालेल्या) उष्ण श्वासांमुळे ज्यांचे ओठ सुकून गेले आहेत, अशी आपली तोंडे खाली घालून, पायाने जमिनीवर रेघोट्या मारत मारीत, काजळ मिसळलेल्या अश्रूंनी आपल्या स्तनांवरील केशराची उटी धुवून गप्प उभ्या राहिल्या.

----------

# अध्याय १, लावणी ४

## राग पीलू जिल्हा.

## तिताल.

त्यासाठी त्यजिले सर्वत्रचि कामाला।।
ऐशा त्या रुदने पूसूनी मलयुक्त लोचनाला।।धृ।।
जो प्रियेतरासम वदे प्रेष्ठ हरि त्याला।।
यत्किंचित्संरंभानी त्या गद्गदवच अबला।।
अनुरक्त होउनी वदति सकल विषयाला[।।]
टाकुनिया अह्मि भजणाऱ्या तुझियाच पादमूला।।
हे ऐसे घातक भाषण प्रभुजी तुजला।।
बोलणे न योग्य भजावे हे दुरवग्रह यांजला।।
चा०।। त्यागी न भजे मुक्तीछू प्रति आदिपुरुषही जसा।।
हे धर्मविदा अनुसरणे पति सुहृदापत्यां असा।।
निजधर्म असे वनितांचा हे कथिले तू राजसा।।
चा०।। ते असे तु उपदेश पद ईश घननिला।।
तू तनूभृतांचा आत्मा बंधूच प्रेष्ठ जाणिला।। त्यासाठी०।।१।।
निश्चये तुझे ठायीच असो यदुपती ।।
निज आत्मा नित्य प्रिय तू तुसि करती कुशलचि रती।।
पतिपुत्रादिक हे सारे दुःखद असती।।
ह्मणुनिया पाव पाव परमेशा आह्मासि इंदिरापती।।
अह्मि धरिलि चिराशा तुजसी तोडु नको ती।।

मन सुखेचि लागत होते गृहि हरिले तू त्या प्रती।।

चा०।। कर करति न गृहकृत्यासी पदभरहि न पद चालती।।

तुझियाच सख्या पदमूलापासुनिया कवण्यारिती।।

व्रजि जावे काय करावे अह्मि ऐसे त्या बोलती।।

चा०।। हासेक्षणकलगीतज कामानल याला।।

तुझियाच अधरपीयुषे सिंची न तरी घननिला।। त्यासाठी०।।२।।

विरहजाग्निने उपयुक्त तनू ध्यानाला।।

करुनिया सखे अह्मि जाउ तुझियाच पाद पदविला।।

वनजनप्रिय तुझ्या पादतला कमलेला।।

जलजाक्षा कधि कधि दिलेले जे तया स्पर्श केला।।

ज्या समयि अह्मी तेव्हाचि पासुनि यांला।।

रमविले असे तू ह्मणूनी न समर्थ करायाला।।

चा०।। स्थिति अन्या संमुख खेदे जिचि दृष्टि पडो ह्मणुनी।।

करतीच इतर सुर यत्ना ती रमा तुलसि करुनी।।

सह वक्षस्थल लाधुनीही सेवीत निश्चयानी।।

चा०।। अनुचरे करुनि जे चरणांबुजरज याला।।

करि इच्छा तद्वत शरण अह्मि तुझे पदरजाला।। त्यासाठी।।३।।

सोडिली वस्ति तुझि उपासनाशा धरुनी[।।]

पदमूलि तुझ्या वृजिनार्दन जाहलो प्राप्त ह्मणुनी।।

या पाव तुझ्या सुस्मितावलोकेकरुनी।।

जाहल्या तीव्र मदनानी तप्तात्मा ज्या कामिनी।।

**दास्यासि देइ त्या युक्तचि अधरसुधेनी।।**

**जे तैसे कुंडलशोभागंडे हि कुंतलानी।।**

**चा०।। जे आवृत ऐशा तुझीया मुखकमला प्रति पाहुनी।।**

**दिधलेचि असे अभया ज्या भुजदंडयुगेकरुनी।।**

**त्या श्रीचे येकचि रमण वक्ष तया विक्षुनी।।**

**चा०।। त्यापरी हसत पाहण्यासही अह्मि सकला।।**

**हे केशव वरद प्रभूजी होतोचि दासि अबला।। त्यासाठी०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील ३०-३९ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

गोपी म्हणाल्या, 'कृष्णा आम्ही तुझ्यासाठी घरदार टाकून आलो आहोत. आम्हाला दुःख देणारे हे बोलणे योग्य नव्हे. तूच आमचा आत्मा आहेस. तूच आमचा बंधू आहेस. आमचा निश्चय तुझ्या ठायीच आहे. पतिपुत्रादिक हे सर्व दुःखकारक पाश आहेत. आता आमचं मन घरात लागत नाही. तुझ्या भेटीची आमच्या हृदयातील तळमळ तुझ्या अधरामृताच्या सिंचनाने शांत कर नाहीतर आम्ही ध्यानाने तुझ्याशी एकरूप होऊ. तुझ्या पदकमलाचा स्पर्श जेव्हा झाला, तेव्हापासून आमचे मन तुझ्या चरणी आसक्त झाले आहे. आम्ही तुला शरण आलो आहोत. आम्ही तुझ्या दासी आहोत.'

**विवरण –**

- पहिल्या कडव्यात गोपींच्या तोंडची वाक्ये आहेत. त्यामुळे तिथे प्रथम पुरुषी सर्वनाम 'अह्मि' असे आहे. मात्र अंतऱ्याच्या

आधीच्या चरणात 'यांजला' असे तृतीय पुरुषी सर्वनाम आहे. आणखी काही ठिकाणी असा सर्वनाम व्यत्यय दिसून येतो.

- 'हासेक्षणकलगीतजकामानल' - हास-ईक्षण-कल-गीत-ज (यातून निर्माण झालेला) –काम-अनल (कामरूपी अग्नी) हा सगळा संस्कृत शब्द मुळातल्या अशाच संस्कृत समासाचे (हासावलोककलगीतहृत्शयाग्नि) फक्त शब्दांतर करून साधला आहे.
- चिराशा - दीर्घकाळ बाळगलेली आशा.
- दुसऱ्या कडव्यातील शेवटच्या मेळाचा पुढच्या कडव्यातील सुरवातीच्या चरणांशी अर्थाच्या दृष्टीने मेळ बसतो आहे तो असा - ... न तरी घननीळा, विरहजाग्नीने तनू ध्यानाला उपयुक्त करुनिया, हे सखे आम्ही तुझ्या पाद-पद्वीला जाऊ.
- त्यानंतरच्या कडव्यातील अन्वय असा –

  हे वनजनप्रिय ! हे जलजाक्ष ! तुझ्या पादतला, जे तू कमलेला कधी कधी दिलेस, तया (त्यांना) अह्मी ज्या समयि स्पर्श केला तेव्हा पासुनि यांला तू रमविले असे. म्हणूनी अन्या संमुख स्थिती करायला (अह्मी) समर्थ न.
- जलजाक्ष - कमळासारखे डोळे असणारा .
- 'अह्मी' (आम्ही) प्रस्तुत असलेल्या या वाक्यात पुढे मात्र 'यांला' असे तृतीय पुरुषी सर्वनाम आहे.
- लाधुनी - लाभुनी (= मिळाल्यामुळे)
- कुंडलशोभागंडे – गंड म्हणजे गाल. कुंडलांनी म्हणजे कुंडलाच्या आभेमुळे शोभणाऱ्या गालांमुळे.

या लावणीत ध्रुवपद आणि पुढे ४ कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात ६ सहा चरण व नंतर तीन चरणांचा अंतरा आणि शेवटी दोन चरणांचा मेळ आहे. हे सर्व सयमक असून अंतरा व मेळ यांची चाल बदल सुचविणारे चा० असे त्यांच्या सुरवातीला अक्षर आहे. शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना त्या सुरवातीची 'त्यासाठी' एवढी अक्षरे आवृत्त करून केली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची द्विपदी विषम मात्रासंख्यांची आहे. पहिल्या चरणात २२ मात्रा असून –।प।प।– –। अशी त्यांची मोडणी असून दुसऱ्या चरणात २८ मात्रा आहेत. – – –।प।–।प।– – अशी त्यांची मोडणी आहे.

कडव्याची द्विपदीही विषम मात्रेचीच आहे. पहिल्या चरणाच्या २२ मात्रांची प।प।⌣ ⌣ – –। अशी मोडणी आहे आणि दुसऱ्या चरणाची २६ मात्रांची मोडणी प।प।प।–। अशी आहे.

अंतऱ्याच्या एका चरणात २७ मात्रा असून त्यांची मोडणी प।प।प।⌣ – अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील ३०-३९ श्लोक (अर्थासहित) असे –

**प्रेष्ठं प्रियेतरमिव प्रतिभाषमाणं कृष्णं तदर्थविनिवर्तितसर्वकामाः।।**
**नेत्रे विमृज्य रुदितोपहते स्म**
**किंचित्संरम्भगद्गदगिरोऽब्रुवतानुरक्ताः।।३०।।**

त्याच्यासाठी आपल्या सर्व कामना सोडून देणाऱ्या, त्याच्या ठायी भक्ती जडलेल्या त्या गोपी, रडून रडून त्रासलेले आपले डोळे पुसून परक्यासारखं बोलणाऱ्या प्रियतम कृष्णाला म्हणाल्या

**गोप्य ऊचुः।।**

**मैवं विभोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं संत्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम्।।**
**भक्ता भजस्व दुरवग्रह मा त्यजास्मान्देवो यथादिपुरुषो भजते मुमुक्षून्।।३१।।**

गोपी म्हणाल्या – हे प्रभो, तू असं कठोर बोलणं योग्य नव्हे. सर्व विषयसुख टाकून आम्ही तुझ्या चरणापाशी (आलोत). अरे हट्टी, भक्त असलेल्या आम्हाला टाकू नकोस ! हे देवा, जसा आदिपुरुष भगवान् श्रीविष्णू मोक्षाची इच्छा असणाऱ्यांस स्वीकारतो, तसा तू आम्हाला स्वीकार.

**यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरङ्ग स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम्।।**
**अस्त्वेवमेतदुपदेशपदे त्वयीशे प्रेष्ठो भवांस्तनुभृतां किल बन्धुरात्मा।।३२।।**

अरे ! पती, मुलेबाळे, स्नेहीजन यांची सेवा करणे हे स्त्रियांचे कर्तव्य आहे, असे जे, धर्मज्ञ असा तू म्हणालास, ते तू अधिकारी उपदेशक म्हणून योग्यच असो ! पण प्राणिमात्रांचा आप्त आणि अंतर्यामी असा तू त्यांना अत्यंत प्रिय आहेस.

**कुर्वन्ति हि त्वयि रतिं कुशलाः स्व आत्मन्**
**नित्यप्रिये पतिसुतादिभिरार्तिदैः किम्।।**
**तन्नः प्रसीद परमेश्वर मा स्म छिन्द्या**
**आशां भृतां त्वयि चिरादरविन्दनेत्र।।३३।।**

हे आत्मस्वरूपा, जाणकार तुझ्यावर प्रेम करतात कारण नित्यप्रिय असा तू असताना दुःख देणाऱ्या पतिपुत्रांदिकांचे काय प्रयोजन ? तर हे परमेश्वरा ! आमच्यावर प्रसन्न हो ! हे कमलाक्षा ! सुदीर्घ काळ तुझ्याठायी जडविलेल्या आमच्या आशा तोडू नकोस !

**चित्तं सुखेन भवताऽपहृतं गृहेषु**
**यन्निर्विशत्युत करावपि गृह्यकृत्ये।।**
**पादौ पदं न चलतस्तव पादमूलाद्**
**यामः कथं व्रजमथो करवाम किं वा।।३४।।**

जे मन घरांत सुखाने लागावयाचे, ते तू आकृष्ट करून घेतलेस. हातही गृहकृत्यात चालत नाहीत. पाय एक पाऊलही पुढे टाकू शकत नाहीत. तुझ्या चरणकमळापासून आम्ही गौळवाड्याकडे कसे जाऊ ? आणि जाऊन करू तरी काय ?

**सिञ्चाङ्ग नस्त्वदधरामृतपूरकेण हासावलोककलगीतजहृच्छयाग्निम्।।**
**नो चेद्वयं विरहजाग्न्युपयुक्तदेहा ध्यानेन याम पदयोः पदवीं सखे ते।।३५।।**

अरे, तुझ्या हास्याने, पहाण्याने, मंजूळ गाण्याने निर्माण झालेल्या आमच्या हृदयातील अग्नीवर तुझ्या अधरामृताची वृष्टी टाक. नाहीतर विरहाच्या अग्नीने ज्यांचा देह गिळंकृत केला आहे, अशा आम्ही ध्यानाने तुझ्या चरणी येऊ.

**यर्ह्यम्बुजाक्ष तव पादतलं रमाया**
**दत्तक्षणं क्वचिदरण्यजनप्रियस्य।।**
**अस्प्राक्ष्म तत्प्रभृति नान्यसमक्षमङ्ग**
**स्थातुं त्वयाऽभिरमिता बत पारयामः।।३६।।**

हे कमलनेत्रा कृष्णा, अरण्यवासी लोकांचा प्रिय असलेल्या तुझ्या पायाच्या तळव्यांनी लक्ष्मीलाही क्षणभरच अवकाश दिला त्याला आम्ही स्पर्श केला, अरे तेव्हापासून तुझ्या ठायीच तू आम्हाला रमविलेस. आता आम्ही दुसऱ्या कुणापुढे कशा उभ्या राहू शकू ?

**श्रीर्यत्पदाम्बुजरजश्चकमे तुलस्या**

**लब्ध्वापि वक्षसि पदं किल भृत्यजुष्टम्।।**

**यस्याः स्ववीक्षणकृतेऽन्यसुरप्रयास-**

**स्तद्वद्वयं च तव पादरजः प्रपन्नाः।।३७।।**

जिच्या स्वतःच्या दृष्टिपातासाठी अन्य देव प्रयास करतात, ती लक्ष्मी तुझ्या वक्षस्थळी स्थान मिळवून सुद्धा तुळशीबरोबर तुझ्या भक्तांच्या आवडत्या चरणकमळाच्या परागांची इच्छा करते. तशाच आम्हीही तुझ्या चरणधुळीला शरण आलो आहोत.

**तन्नः प्रसीद वृजिनार्दन तेऽङ्घ्रिमूलं**

**प्राप्ता विसृज्य वसतीस्त्वदुपासनाशाः।।**

**त्वत्सुन्दरस्मितनिरीक्षणतीव्रकाम-**

**तप्तात्मनां पुरुषभूषण देहि दास्यम्।।३८।।**

तर तुझी उपासना एवढीच इच्छा असणाऱ्या आम्ही घरदार सोडून तुझ्या पायाशी आलो आहोत. आमच्यावर प्रसन्न हो ! हे पुरुषोत्तमा ! तुझ्या सुंदर अशा स्मितहास्याने आणि निरीक्षणाने तुझ्या प्राप्तीची आमची इच्छा तीव्र तीव्र होत आहे, त्यामुळे तापलेल्या आम्हाला तुझे दास्य दे.

**वीक्ष्यालकावृतमुखं तव कुण्डलश्री-**

**गण्डस्थलाधरसुधं हसितावलोकम्।।**

**दत्ताभयं च भुजदण्डयुगं विलोक्य**

**वक्षः श्रियैकरमणं च भवाम दास्यः।।३९।।**

कुंडलांच्या प्रभेने शोभणारे, अमृतासारखे ओठ असणारे, स्मितहास्य आणि कटाक्ष असणारे, केसांनी आच्छादलेले मुख पाहून तसेच अभय देणारे दोन्ही बाहुदंड पाहून तसेच एकट्या लक्ष्मीचेच क्रीडा सुखस्थान असणारे वक्षःस्थल पाहून आम्ही तुझ्या दासी व्हावे असे आम्हाला वाटते.

----------

## अध्याय १, लावणी ५

**राग देसकल्याण जिल्हा.**

**तिताल.**

**कवण नारि प्रभु तुझिया मोहित मधुर वेणुगायनी।।**

**त्रिलोकी आर्यचालिपासुनी।।धृ।।**

**न चले पाहुन तुझ्या त्रिलोकित सौभगरूपाला।।**

**तरुद्विजगोमृगदेहाला।।**

**उठती रोमांचहि मोहुन सुरलोक रक्षण्याला।।**

**जसा सुर आदि पुरुष जाहला।।**

**स्पष्ट तसा भज जनार्तिहर तू आर्तबंधु धननिला।।**

**ह्मणुनि दे ठेउन करकमला।।**

**चा०।। अह्मि किंकरियाच्या तप्त मस्तकी स्तनी।।**

**शुक वदे असे तद्वच विकलित ऐकुनी।।**

योगेश प्रभु जो आत्मारामहि वनी।।
चा०।। हसुनी मोठ्यानि सदय सुंदरी।।
गोकुलिच्या रमवीच तया अवसरी।।
चा०।। उदारचेष्टित हरीक्षणानी विकसितमुखि कामिनी।।
तयाच्या सहीत त्या काननी।। कवण०।।१।।
उदारहासी दंतिजयाच्या कुंदतुल्य दिधिती।।
जसा भगणानि यामिनीपति।।
आवृत शोभे अच्युत त्या परि उरस्थलावरती।।
धरी वैजयंति मालेप्रती।।
स्तूयमान करि उंच गायना वनिताशतगणपती।।
फिरे शोभवीत गहनाप्रती।।
चा०।। त्या नदिची चंचल नंदा करणारी।।
जी कुमुदे त्याची गंधवायुलहरी।।
तिजसीच युक्त त्या सीतलवालूकतिरी।।
चा०।। वनितासह तिथे रमे जाउनी।।
श्रीहरि हो बाहुतेच ही पसरुनी।।
चा०।। परिरंभणकुचकरालकोरुनीवीते स्पर्शुनी।।
तयांचे वदनांबुज चुंबुनी।।कवण०।।२।।
नखाग्रपाते तसे विनोदे भाषणही करुनी।।
केलिने हसूनिया पाहुनी।।
गोकुलसुंदरिच्या रतिपतिला उद्दीपन करुनी।।

रमवि त्या अशा प्रकारानी।।
अनासक्त मन असा कृष्ण भगवान तयापासुनी।।
लाधल्या मानाते मानिनी।।
चा०।। सुंदरीमध्ये आपणासि महिवर मनी।।
मानिती अधिक मग त्यांचा श्रीहरिनी।।
तत्सौभगमद तैसाहि मान पाहुनी।।
चा०।। शमण्यासाठीच प्रसादास्तव।।
त्या जागी जाहला गुप्त माधव।।
चा०।। शरदनिशा पाहून मनोहर मुरलीते काननी।।
वाजवी यदुपति ती ऐकुनी।। कवण।।३।।
येति सकलहि गोपसुंदरी गृहकृत्ये टाकुनी।।
तयाते श्रीहरिनी पाहुनी।।
बोले आला बरेचि केले आता व्रजि जाउनी।।
करावी पतिसेवा सतिनी।।
ऐकुन हे वच विरहे कामिनी व्याकुल होउन मनी।।
पडति त्या श्रीपतिनी पाहुनी।।
चा०।। रमवी च दयेने नदीतिरी सुंदरी।।
तेव्हा त्या धन्यचि अपल्यासी महिवरी।।
मानिती स्त्रियामधि अशा निरीक्षुनि हरी।।
चा०।। झाला तेथेचि गुप्त यदुपती।।
गर्वाते हरण्यासि प्रसादाप्रती।।

**चा०।। करावया त्या केशववरदश्रीपतिते भक्तिनी।।**

**भजति ते जाती भव तरुनी।। कवण।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकोणतिसाव्या अध्यायातील ४०-४८ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

गोपी म्हणाल्या, 'कृष्णा, तुझ्या वेणूच्या आणि त्रैलोक्य सुंदर रूपाच्या मोहिनीने कोणती आर्य स्त्री ढळणार नाही ? आमच्या तप्त मस्तकांवर आणि स्तनांवर तुझे करकमल ठेव'. मग कृष्णाला त्यांचे व्याकूळ बोलणे ऐकून दया आली आणि तो त्यांना यमुनेच्या शीतल वाळवंटावर खेळवू लागला. आलिंगन देऊन, त्यांचे स्तन, हात, कुरळे केस, मांड्या, निऱ्या यांना स्पर्श करून, चुंबन घेऊन, नखाग्रपात करून, हसून, सुंदर भाषण करून कृष्ण त्या स्त्रियांना रमवू लागला. मात्र या सगळ्यात तो भगवंत अनासक्त होता. पण भगवंत आपल्याला मानतो म्हणजे आपण फार भाग्यवान आहोत, असा गर्व त्या मानिनींना झाला. तो गर्व शमविण्यासाठी आणि त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठी भगवंत गुप्त झाला.

**विवरण –**

- या लावणीत ध्रुवपद आणि पहिल्या कडव्यात मिळून अन्वय लागत आहे, तो असा –

  तुझिया मधुर वेणुगायनी मोहित, कवण नारी त्रिलोकी आर्यचालीपासुनी चले न (ढळणार नाही) ?

- असाच आंतर अन्वय कडव्याचा चरण आणि अंतरा यात आहे.

- म्हणुनि अम्हि किंकरियाच्या तप्त मस्तकी स्तनी करकमलाला ठेवून दे.
- पहिल्या कडव्याचे शेवटचे चरण आणि दुसऱ्याचे सुरवातीचे चरण मिळून अन्वय लागतो, तो असा –
- जयाच्या उदारहासी कुंदतुल्य दंति (=कुंदकळ्यांसारख्या दातांतून) दिधिति (किरण) (बाहेर पडत आहेत) असा तो अच्युत, उदारचेष्टित विकसितमुखी कामिनी, तयांच्या सहित आवृत त्या काननी शोभे, जसा भगणांनि (नक्षत्रगणानी) आवृत (=वेढलेला) यामिनीपती (=चंद्र)
- तिसऱ्या कडव्यातील अंतऱ्यापाशीच 'त्या जागी जाहला गुप्त माधव' अध्यायातील शेवटच्या श्लोकाचा आशय पूर्ण होतो. म्हणजे पहिल्या अध्यायाचे निरूपण संपते. तिथून पुढच्या कडव्यात पहिल्या अध्यायाचा सारांश सांगितला आहे. शेवटच्या ओळीतील 'करावया' या शब्दाचा अन्वय अंतऱ्यातील शब्दांशी आहे.
- या लावणीत ध्रुवपद व सहा सहा चरणांची चार कडवी असून पुढे दोन चरणांचा अंतरा आणि शेवटी दोन चरणांचा मेळ आहे. हे सर्व सयमक असून कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना 'कवण' असे सुरवातीचे शब्द आवृत्त करून दिली आहे. अंतरा आणि मेळाच्या चालबदलाची सूचना तत्पूर्वी ।।चा०।। असे अक्षर टाकून दिली आहे.
- येथे दोन दोन चरणांची जोडी असून त्या द्विपदीतील पहिला चरण दीर्घ किंवा मोठा असून दुसरा त्या मानाने अखुड आहे.

ध्रुवपदाच्या पहिल्या चरणात २७ मात्रा असून प।प।प।⌣ –। असा त्यांचा रचनाक्रम आहे. दुसऱ्या चरणातील १६ मात्रांचा ⌣ – –।प।⌣ –। असा रचनाक्रम आहे.

कडव्याच्या द्विपदीतील पहिल्या चरणात २६ मात्रा असून त्याची मोडणी प।प।प।– अशी आहे. दुसऱ्या चरणाच्या १५ मात्रांची मोडणी ⌣ – ⌣ ⌣ –।प। अशी आहे.

अंतऱ्याचा एक चरण २१ मात्रांचा असून प।–।प।⌣ –। अशी त्याची मोडणी दिसून येते.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील ४०-४८ श्लोक (अर्थासहित) असे –

**का स्त्र्यङ्ग ते कलपदायतमूर्च्छितेन**

**संमोहितार्यचरितान्न चलेत्त्रिलोक्याम्।।**

**त्रैलोक्यसौभगमिदं च निरीक्ष्य रूपं**

**यद्गोद्विजद्रुममृगाः पुलकान्यबिभ्रन्।।४०।।**

अरे कृष्णा ! त्रैलोक्य सुंदर असं तुझं रूप पाहून गाई, पक्षी, झाडे आणि पशूसुद्धा जिथे रोमांचित होतात, तिथे या जगात तुझ्या मंजूळ आलापांनी उंच स्वरात गायलेल्या गीताने संमोहित झालेली स्त्री तिच्या श्रेष्ठ अशा शीलापासून का बरे ढळणार नाही ?

**व्यक्तं भवान्व्रजभयार्तिहरोऽभिजातो**

**देवो यथादिपुरुषः सुरलोकगोप्ता।।**

**तन्नो निधेहि करपङ्कजमार्तबन्धो**

**तप्तस्तनेषु च शिरस्सु च किंकरीणाम्।।४१।।**

तू व्रजांचे भय आणि दुःख दूर करणारा, देव, आदिपुरुष आहेस, स्वर्गाचे रक्षण करणारा म्हणून प्रकट झाला आहेस हे अगदी स्वच्छ आहे. तर हे दीनबंधो ! आम्हां दासींच्या तापलेल्या स्तनांवर आणि मस्तकावर तुझे करकमल ठेव !

**श्रीशुक उवाच।। इति विक्लवितं तासां श्रुत्वा योगेश्वरेश्वरः।।**

**प्रहस्य सदयं गोपीरात्मारामोऽप्यरीरमत्।।४२।।**

योगेश्वरांचाही ईश्वर असणारा, स्वतःच्याच ठिकाणी रमणारा तो त्यांचे दीनवाणे बोलणे ऐकून दयाळूपणे त्या गोपींना रमवू लागला.

**ताभिः समेताभिरुदारचेष्टितः प्रियेक्षणोत्फुल्लमुखीभिरच्युतः।।**

**उदारहासद्विजकुन्ददीधितिर्व्यरोचतैणाङ्क इवोडुभिर्वृतः।।४३।।**

सुंदर हावभाव असणारा, सुंदर हसण्यामुळे दांताच्य कुंदकळ्यांच्या तेजाने युक्त असा तो कृष्ण प्रियाच्या दृष्टिक्षेपामुळे चेहरे फुलून आलेल्या आणि (भोवती) गोळा झालेल्या त्या गोपींमुळे नक्षत्रांनी वेढलेल्या चंद्राप्रमाणे दिसू लागला.

**उपगीयमान उद्गायन्वनिताशतयूथपः।।**

**मालां बिभ्रद्वैजयन्तीं व्यचरन्मण्डयन्वनम्।।४४।।**

वैजयंती माला  धारण करणारा, (गोपींकडून) स्तविला जाणारा, स्वतः उच्च स्वराने गाणारा, शेकडो स्त्रियांच्या घोळक्यांना आपल्या मागोमाग आणणारा तो वनाला शोभवीत फिरू लागला.

**नद्याः पुलिनमाविश्य गोपीभिर्हिमवालुकम्।।**

**रेमे तत्तरलानन्दकुमुदामोदवायुना।।४५।।**

नदीच्या थंडगार वाळवंटावर जाऊन, आनंद देणाऱ्या, नाजूक कमळांवरच्या सुखकारक वाऱ्याच्या समवेत तो (तेथे) गोपींसह क्रीडा करू लागला.

**बाहुप्रसारपरिरम्भकरालकोरु-**
**नीवीस्तनालभननर्मनखाग्रपातैः।।**
**क्ष्वेल्याऽवलोकहसितैर्व्रजसुन्दरीणाम्**
**उत्तम्भयन् रतिपतिं रमयांचकार।। ४६।।**

हात पसरणे, आलिंगन देणे, हात, केस, मांड्या, निऱ्या, स्तनांना स्पर्श करणे, नखांनी नाजूकपणे टोचणे, अशा कृतींनी तसेच थट्टेने पहाणे आणि हसणे या द्वारा त्या गोकुळातील सुंदरींच्या मनातील मदनाला उत्तेजित करीत तो कृष्ण त्यांना रमवू लागला.

**एवं भगवतः कृष्णाल्लब्धमाना महात्मनः।।**
**आत्मानं मेनिरे स्त्रीणां मानिन्योऽभ्यधिकं भुवि।।४७।।**

अशा प्रकारे थोर अशा भगवान् कृष्णाच्या कडून मान मिळालेल्या त्या मानी स्त्रिया स्वतःला पृथ्वीवरील सर्व स्त्रियांच्यात श्रेष्ठ मानू लागल्या.

**तासां तत्सौभगमदं वीक्ष्य मानं च केशवः।।**
**प्रशमाय प्रसादाय तत्रैवान्तरधीयत।।४८।।**

आपल्या सुदैवाविषयीचा त्यांचा गर्व आणि ताठा पाहून त्यांना शांत करण्यासाठी आणि त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठी कृष्ण त्याच ठिकाणी अंतर्धान पावला.

# अध्याय २, लावणी १

## राग इमनकल्याण.

## तिताल.

श्रीशुक महीपतिस वदला।।
अकस्मात भगवान रमावर अंतर्हित जाहला ।।धृ।।
न पाहुन त्या व्रजमृगनयनी।।
तापाते पावल्या जशा त्या यूथपासि हस्तिनी।।
रमापतिच्या गतिने प्रीतिनी।।
स्मितविभ्रमवीक्षणे मनोरम आलापे करुनी।।
विहारासहित विभ्रमानी।।
त्या त्या चेष्टा घेति तदात्मिक कृष्टमना कामिनी।।
चा०।। प्रियकराच्या गतिहासेक्षणवचनी।।
जाहाल्या त्या प्रतिरूढ मूर्ति ह्मणुनी।।
श्रीहरीच्या सम केलिविभ्रमानी।।
चा०।। त[दा]त्मिक होउनिया अबला।।
निवेदिती हा मीच परस्पर असे प्रिया सकला।। श्रीशुक०।।१।।
मिळुन त्यातेच उंच गाती।।
उन्मत्तकवत वनावनाते शोध करित फिरती।।
गगनवद्वाह्यांतरभूती।।

सतत राहि जो पुरुष तयाते वनस्पतिस पुसती।।

आमचे मन हरुनी श्रीपती।।
हासप्रेमेक्षणे करुनिया गेला जो त्या प्रती।।
चा०।। पाहिला की हे पिंपल वट पिंपरी।।
मानिनीचा जो दर्पहरस्मित हरी।।
हलधरानुज गेलेला पाहिला तरी।।
चा०।। नाग पुन्नाग चंपकाला।।
अशोक कुरबक याते पुसती सर्वहि व्रज अबला।। श्रीशुक०।।२।।
कुठे हे कल्याणी तुलसी।।
श्रीपतिचरणप्रिये अलिकुलासहित धरी तुजसी।।
अतिप्रिय अच्युत जो त्यासी।।
पाहिला कि मल्लिके जाति जुइ मालति प्रीतीसी।।
कर स्पर्शोनि करुन तुमसी।।
गेलेला पाहिला कि माधव बिल्वार्कस्त्रंसी।।
चा०।। पनसासनच्यूतांम्रजंबुबकुला।।
राजादनकुद्दालकदंबाला।।
याहुनी जे तरु अन्य परार्थाला।।
चा०।।जन्मले यमुनापुलिनाला।।
त्या पुसती अह्मि रहितमना या वदा हरिपथाला।। श्रीशुक।।३।।
कोणते तप केले अवनी।।
श्रीहरिचरणस्पर्शोत्साहे रोमांचित होउनी।।
शोभते ह्मणुन वाटते मनी।।

**की पदसंभव हर्ष उरुक्रम पदाक्रमे करुनी।।**

**की किटिशरिरश्लेषानी।।**

**सखि मृगि गात्रे हरि प्रिये सह दृष्टीते येथुनी।।**

**चा०।। तुमच्याच ही पसरीत सुखे जवळुनी।।**

**गेलाच की कांतांगसंगकरुनी।।**

**अतिसुंदर कुचकुंकुम जे त्यानी।।**

**चा०।। सुशोभित कुंदाची माला।।**

**केशव वरद प्रभुचि तिचा येतसे गंध या स्थला।।श्रीशुक०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील १-११ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

श्रीकृष्ण अकस्मात् अंतर्धान पावल्यामुळे त्या व्रजसुंदरी अत्यंत व्याकूळ झाल्या. कृष्णाचे हसणे, कटाक्ष टाकणे, बोलणे, चालणे, अन्य हालचाली त्या तदात्म होऊन आठवू लागल्या. उच्च रवाने त्याचीच गाणी गाऊ लागल्या. यमुनेच्या तीरावरच्या सगळ्या झाडांझुडपांना, 'तुम्ही कृष्णाला पाहिलं का ?' म्हणून विचारू लागल्या. त्यांनी पृथ्वीला विचारले की तू कोणते तप केले होतेस म्हणून श्रीहरीचा चरणस्पर्श तुला झाला ? गोपींनी हरिणीलाही विचारले की श्रीहरी इथून गेला का प्रियेसह ?

**विवरण –**

- प्रतिरूढ मूर्ति – हा संस्कृत शब्द जसाच्या तसाच वापरला आहे. मूर्ति म्हणजे आकार, रूप अथवा शरीरे. प्रतिरूढ म्हणजे आरूढ. विरहाने भान हरपल्यामुळे गोपी स्वतःलाच कृष्ण समजून

कृष्णासारख्या वागू लागल्या. त्यामुळे त्यांची शरीरे कृष्ण या विचारांवर जणू आरूढ झाली होती. शरीरे त्यांची होती पण त्यांद्वारा होणारे चालणे, हासणे, पाहणे, मनोरम गाणे, अन्य आकर्षक हालचाली या सर्व कृष्णाच्या होत्या.

- पहिल्या कडव्याच्या मेळातील पहिल्या चरणात 'तत्मिक' असा शब्द आहे. संदर्भ, मूळ व मात्रासंख्या लक्षात घेता तिथे तदात्मिक असणे अपेक्षित आहे. हा मुळात नसलेला 'दा' हा वर्ण घातल्यामुळे तो [ ] अशा चौकटी कंसात टाकला आहे.
- उन्मत्तकवत - उन्मत्तकवत् (= वेड्यासारखे, मराठीतला वत् – 'च्यासारखे' या अर्थाचा प्रत्यय इथे वत असा स्वरान्त वापरला आहे.)
- तिसऱ्या कडव्यातील अन्वय - हे श्रीपतिचरणप्रिये, कल्याणी तुलसी ! अलिकुलासहित (भुंग्यांसह) जो तुजसी धरी, (तो) जो अतिप्रिय अच्युत, त्यासी पाहिला का ?
- बिल्वार्कस्त्रंसी = बिल्व (=बेल), अर्क (=रुई) व स्त्रंसी (=प्रियाल या संस्कृत वृक्षनावासाठी, खिरणी असे भाषांतर आढळते), पीलू किंवा शिरिष वृक्ष (कोशानुसार)
- किटिशरीर – किटि (=वराह)चे शरीर
- चौथ्या कडव्यातील अंतरा आणि पुढचा मेळ मिळून एक वाक्य आहे. ते असे – सखि मृगि, तुमच्याही दृष्टीते गात्रे (=आपल्या गात्रांनी) सुखे पसरवीत, हरी प्रियेसह कांतासंग करुनी येथुनी गेलाच की ?

याही लावणीत ध्रुवपदासह चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात सहा चरण, मग तीन चरणांचा अंतरा आणि शेवटी दोन चरण अशी रचना आहे. पहिले सहा चरण, अंतऱ्याचे तीन आणि मेळाचे दोन हे सयमक आहेत. अंतरा आणि मेळ यांच्या चाल बदलण्याची सूचना ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. तसेच प्रत्येक कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाचीही सूचना ध्रुवपदातील पहिली तीन अक्षरे (श्रीशुक) उद्धृत करून केली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाच्या द्विपदीतील पहिल्या चरणात १४ मात्रा असून – ⌣ ⌣।प।–। अशी त्यांची मोडणी आहे. दुसऱ्या चरणाच्या २६ मात्रांची मोडणी प।प।प।–। अशी दिसते. कडव्याच्या दोन चरणांत अनुक्रमे १५ व २६ मात्रा असून त्यांची मोडणी अनुक्रमे ⌣।प। ⌣ ⌣ ⌣ ⌣ –। अशी आणि प।प।प।– अशी आहे.

अंतऱ्याच्या १९ मात्रांचा प।प।⌣ – असा रचनाक्रम दिसतो.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील १-११ श्लोक (अर्थासहित) असे –

**।।श्रीशुक उवाच।। अन्तर्हिते भगवति सहसैव व्रजाङ्गनाः।।**
**अतप्यंस्तमचक्षाणाः करिण्य इव यूथपम्।।१।।**

श्रीशुक म्हणाले – कळपाचा नायक हत्ती दिसेनासा झाल्यावर हत्तीणी जशा व्याकूळ होतात, तशा भगवान् श्रीकृष्ण एकाएकी अंतर्धान पावल्यावर, तो न दिसल्यामुळे त्या गोपी अतिशय दुःखी झाल्या.

**गत्यानुरागस्मितविभ्रमेक्षितैर्मनोरमालापविहारविभ्रमैः।।**

**आक्षिप्तचित्ताः प्रमदा रमापतेस्तास्ता विचेष्टा जगृहुस्तदात्मिकाः।।२।।**

कृष्णाचे चालणे, प्रेमाने व हसून नेत्रकटाक्ष टाकणे, मनाला आनंद देणारे त्याचे बोलणे आणि आकर्षक हालचाली यांमुळे ज्यांचे चित्त त्याच्याकडे खेचले गेले आहे अशा त्या सुंदर स्त्रिया तन्मय होऊन त्याच्यासारख्या लीला करू लागल्या.

**गतिस्मितप्रेक्षणभाषणादिषु प्रियाः प्रियस्य प्रतिरूढमूर्तयः।।**
**असावहं त्वित्यबलास्तदात्मिका न्यवेदिषुः कृष्णविहारविभ्रमाः।।३।।**

त्यांच्या प्रियाच्या, चालणे, स्मितहास्य करणे, नेत्रकटाक्ष टाकणे, बोलणे इ. क्रियांच्यात ज्यांचा देह आत शिरून बसला आहे, अशा, कृष्णाच्या हालचालींसारख्या सुंदर हालचाली करणाऱ्या, तन्मय झालेल्या त्या कृष्णाच्या प्रिय गोपी 'मी तो आहे' असे एकमेकींना म्हणू लागल्या.

**गायन्त्य उच्चैरमुमेव संहता विचिक्युरुन्मत्तकवद्वनाद्वनम्।।**
**पप्रच्छुराकाशवदन्तरं बहिर्भूतेषु सन्तं पुरुषं वनस्पतीन्।।४।।**

एकत्र आलेल्या व त्याचीच मोठ्याने गाणी गाणाऱ्या, वेड्यासारख्या वनावनातून त्याला शोधत फिरणाऱ्या त्या गोपी, आकाशासारखा प्राणिमात्रांना अभ्यन्तरी व्यापून राहिलेल्या त्या आदिपुरुषाविषयी झाडांना विचारू लागल्या.

**दृष्टो वः कच्चिदश्वत्थ प्लक्ष न्यग्रोध नो मनः।।**
**नन्दसूनुर्गतो हृत्वा प्रेमहासावलोकनैः।।५।।**

हे पिंपळवृक्षा ! हे पिंपरीवृक्षा ! हे वटवृक्षा ! प्रेमाने, हास्याने आणि नेत्रकटाक्षांनी आमचे मन हरण करणारा तो नंदाचा पुत्र तुम्हाला कुठे दिसला का ?

**कच्चित्कुरबकाशोकनागपुन्नागचम्पकाः।।**
**रामानुजो मानिनीनामितो दर्पहरस्मितः।।६।।**

हे कोरांटी ! हे अशोकवृक्षा ! हे नागचाफ्या ! हे पुंन्नागा ! हे सोनचाफ्या ! आपल्या स्मित हास्याने मानी स्त्रियांचा ताठा नाहीसा करणारा तो बलरामाचा धाकटा भाऊ इथून गेला का हो ?

**कच्चित्तुलसि कल्याणि गोविन्दचरणप्रिये।।**
**सह त्वाऽलिकुलैर्बिभ्रद्दृष्टस्तेऽतिप्रियोऽच्युतः।।७।।**

गोविंदाचे चरण प्रिय असणाऱ्या हे कल्याणी तुलसी ! भुंग्यांच्या बरोबरच तुलाही धारण करणारा तो तुझा अत्यंत प्रिय असा कृष्ण तू पाहिलास का ग ?

**मालत्यदर्शि वः कच्चिन्मल्लिके जाति यूथिके।।**
**प्रीतिं वो जनयन्यातः करस्पर्शेन माधवः।।८।।**

हे मालती ! हे मोगरी ! हे जाई ! हे जुई ! आपल्या हाताच्या स्पर्शाने तुम्हाला आनंद देत देत जाणारा कृष्ण तुम्हाला दिसला का ?

**चूतप्रियालपनसासनकोविदार-**
**जम्ब्वर्कबिल्वबकुलाम्रकदम्बनीपाः।।**
**येऽन्ये परार्थभवका यमुनोपकूलाः**
**शंसन्तु कृष्णपदवीं रहितात्मनां नः।।९।।**

अंबा, प्रियाल, फणस, असन, कोविदार, जांभूळ, रुई, बेल, बकूळ, कदंब व नील अशोक या वृक्षांनी तसेच यमुनेच्या तीरावरच्या परोपकारासाठी जन्म घेणाऱ्या अन्य वृक्षांनी (कृष्ण विरहामुळे) शून्यमनस्क झालेल्या आम्हाला कृष्णाचा मार्ग सांगावा !

**किं ते कृतं क्षिति तपो बत**

**केशवाङ्घ्रिस्पर्शोत्सवोत्पुलकिताङ्गरुहैर्विभासि।।**

**अप्यङ्घ्रिसंभव उरुक्रमविक्रमाद्वा आहो वराहवपुषः परिरम्भणेन।।१०।।**

हे पृथ्वी ! तू काय तप केलेस की कृष्णाच्या चरणस्पर्शाच्या आनंदामुळे अंगावर उभ्या राहिलेल्या रोमांचांनी तू शोभून दिसत आहेस ! पदस्पर्शामुळे निर्माण झालेला आनंद वामनावतारी विष्णूमुळे आहे की वराहावतारी विष्णूच्या आलिंगनाने आहे ?

**अप्येणपत्न्युपगतः प्रिययेह गात्रै-**

**स्तन्वन्दृशां सखि सुनिर्वृतिमच्युतो वः।।**

**कान्ताङ्गसङ्गकुचकुङ्कुमरञ्जितायाः**

**कुन्दस्रजः कुलपतेरिह वाति गन्धः।।११।।**

सखि हरिणी ! आपल्या अंगोपांगांनी तुमच्या दृष्टीला सुख देणारा तो कृष्ण आपल्या प्रियेसह इथे आला होता का ? त्या कुलपती प्रियेच्या अंगसंगामुळे त्यांच्या स्तनावरील केशराने रंगलेल्या कुंदाच्या हाराचा गंध इथून वहात आहे !

----------

# अध्याय २, लावणी २

## राग देसपीलू जिल्हा.

### तिताल.

कामिनिच्या ठेउन स्कंधावरि बाहूला।
घेउनिया हस्तामधि सुंदर कमलाला।।धृ।।
तुलसिकामदानी अंध अलिकुले त्यानी।
अन्वीयमान बलदेवानुज येथूनी।।
हे तरू प्रणामा तुमच्या स्वीकारूनी।।
किंवा तो गेला प्रणयवीक्षणे करुनी।।
आहेत लता या वनस्पतिस बाहूनी।।
आलिंगित दिसती रोमांचित ही ह्मणुनी।।
चा०।। वाटते तयांचा नखस्पर्श यां झाला।।।
अपसांत ह्मणति त्या असे पुसा हो यांला।।
कृष्णाचे शोधे होति प्राप्त भीतीला।।
चा०।। उन्मत्तचि भाषण असे करिति त्या अबला।।
होऊन तदात्मिक त्या त्या भगवल्लीला।। कामिनि।।१।।
होऊन कृष्णसम कोणी स्तनपानाते।।
पूतनावदाचरणारि तिचेही करिते।।
शकटाच्या सम आचरणा जी करि तीते।।
होऊन तोकसम रडुन पदानी वधिते।।
श्रीहरी बालभावानी येणारी ती।

होऊन असुरसम अन्य करी हरणाते।।
चा०।। अंघ्रिला घोष निस्वनेच कर्षण करुनी।।
रांगती झालि हरि राम दोघि होऊनी।।
ऐशा त्या कोणी गोप होति त्यातूनी।।
चा०।। वत्सासुर तैसी बकवत झालेलीला।।
मारिती दोघि त्या तद्वत करुनी लीला।। कामिनि।।२।।
हरि जसा दूर गेल्या ज्या त्या धेनूते।।
बोलावी तद्वत त्याचे अनुकरणाते।।
करणारि केलिने वेणू वाजवितीते।।
अन्या त्या वदती साधु साधु ऐशाते।।
अपरेच्या ठेउन स्कंधी कोणि भुजाते।।
चलणारी होउन तन्मय ऐशी वदते।।
चा०।। मी हरी पाहा या माझे ललितगती ते।।
भिउ नका वातवर्षांनी मी त्राणाते।।
करितसे असे ती वदे सर्व वनिताते।।
चा०।।यत्नानि येक हस्तानी वरि वसनाला।।
धरि करि ती केशववरदप्रभुवल्लीला।। कामिनि।।३।।
हे नृपा येक गोपीनि अपर वनितेला।।
आरोहण करुनी शिरी पदाक्रमणाला।।
करुनिया वदे दुष्टाहे गच्छ खलाला।।
हा माझा रे दंडार्थ जन्म जाहला।।

**गोप होय हा या उल्बण दावाग्नीला।।**
**बोलते येक त्यांमधे मिटा नयनाला।।**
**चा०।। तुमचेच आता मी करी त्वरित क्षेमाते।।**
**अन्येनी माले करुन कोणि तन्वीते।।**
**बांधिले असे हो त्या समयी उखलाते।।**
**चा०।। अतिसुंदरनयना भ्यालेली वदनाला।।**
**झाकून करी भीतीच्या अनुकरणाला।। कामिनि।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील १२-२३ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

'आपल्या प्रियेच्या खांद्यावर हात ठेवून व हातात कमळ ठेवून तो बलदेवाचा धाकटा भाऊ इथून गेला का ?' असे झाडांना विचारीत गोपी कृष्णाचा शोध घेत फिरत होत्या. पुढे पुढे तर त्या कृष्णमयच झाल्या आणि वेड्यासारखेच बोलायला आणि करायला लागल्या. कुणी कृष्ण झाली आणि पूतना झालेल्या दुसऱ्या कुणाचे स्तनपान करू लागली. कुणी शकट झाली. कुणी बाळकृष्णासारखे रांगू लागली. कुणी वत्सासुरास व बकासुरास कृष्णाने मारले त्या लीला करू लागल्या. कुणी वेणू वाजवू लागली. कुणी कृष्णासारखी चालू लागली. कुणी कालिया झाली. कुणी कृष्ण होऊन तिच्या मस्तकी उभी राहिली. एकीने दुसरीला कृष्ण समजून उखळाला बांधले. बांधलेली ती मग डोळे झाकून भीती वाटत असल्याचे दाखवू लागली.

**विवरण –**

- आपसात म्हणती त्या असे पुसा हो यांला – कृष्ण दिसेनासा झाल्यावर व्याकूळ होऊन गोपी झाडे वेलींना कृष्ण कुठे दिसला का तुम्हाला ? असे विचारीत फिरत होत्या. या ठिकाणी वेली रोमांचित झालेल्या दिसल्या म्हणून त्या एकमेकींना म्हणत आहेत की या वेलींना विचारा ग कृष्ण दिसला का ?
- बकवत, तद्वत - बकवत् , तद्वत् यांची स्वरान्त रूपे
- दुष्टाहे गछ – मूळ संस्कृतातले उद्धृत केले आहे. हे दुष्ट अहे, गच्छ. (अहि = नाग, कालियाला उद्देशून म्हणत आहे, 'अरे दुष्ट सापा जा'.)
- उल्बण = भयंकर
- तिसऱ्या कडव्यातील शेवटच्या चरणाचा अन्वय - यत्नानि येक हस्तानी वसनाला वरि धरि. ती केशववरद्प्रभुवत् लीला करि.

या लावणीमधे ध्रुवपद् व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात सयमक असे ६/६ चरण, सयमक असा ३ चरणांचा अंतरा आणि पुढे दोन चरणांचा मेळ अशी रचना आहे. अंतरा व त्यानंतरचा मेळ यांच्या चालबदलाची सूचना ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना 'कामिनी' अशी सुरवातीची अक्षरे उद्धृत करून केली आहे.

या लावणीच्या ध्रुवपदातील दोन्ही चरण सममात्रिक असून प्रत्येकी २२ मात्रांचे आहेत. मात्र प्रत्येक चरणात मात्रांचा रचनाक्रम वेगळा आहे. तो अनुक्रमे प।प।– – –। आणि प।प।⌣ ⌣ – –। असा आहे.

कडव्यातील दोन्ही चरण सममात्रिक असून प्रत्येकी २२ मात्रांचे आहेत व त्यांची मोडणीही समान म्हणजे प। प। — — — अशी आहे.

अंतऱ्याचाही एक चरण २२ मात्रांचा असून वरील मोडणीचाच आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील १२-२३ श्लोक (अर्थासहित) असे –

**बाहुं प्रियांस उपधाय गृहीतपद्मो**
**रामानुजस्तुलसिकालिकुलैर्मदान्धैः।।**
**अन्वीयमान इह वस्तरवः प्रणामं**
**किं वाऽभिनन्दति चरन्प्रणयावलोकैः।।१२।।**

हे वृक्षांनो ! हातात कमळ घेतलेला, मदान्ध असे तुळशीवरचे भुंगे ज्यांच्या मागोमाग येत आहेत असा, प्रियेच्या खांद्यावर बाहू ठेवून फिरणारा तो बलरामाचा धाकटा भाऊ प्रेमभऱ्या कटाक्षांद्वारा तुमचे प्रणाम स्वीकारीत होता का ?

**पृच्छतेमा लता बाहूनप्याश्लिष्टा वनस्पतेः।।**
**नूनं तत्करजस्पृष्टा बिभ्रत्युत्पुलकान्यहो।।१३।।**

(सख्यांनो !) या वेलींना विचारा वनस्पतीच्या बाहूंना बिलगलेल्या असतानाही, त्याच्या नखांनी स्पर्शिल्या गेल्यावर त्या रोमांच धारण करीत आहेत.

**इत्युन्मत्तवचो गोप्यः कृष्णान्वेषणकातराः।।**

**लीला भगवतस्तास्ता ह्यनुचक्रुस्तदात्मिकाः।।१४।।**

अशा रीतीने वेड्यासारखी बडबड करणाऱ्या, कृष्णाला शोधता शोधता व्याकूळ झालेल्या, त्याच्याशी तन्मय होऊन भगवंताच्या त्या त्या लीलांचे अनुकरण करू लागल्या.

**कस्याश्चित्पूतनायन्त्याः कृष्णायन्त्यपिबत्स्तनम्।।**
**तोकायित्वा रुदत्यन्या पदाहन् शकटायतीम्।।१५।।**

पूतना झालेल्या कुणा एकीचा स्तन, कृष्ण झालेली कुणी एक चोखू लागली. लहान मूल होऊन रडणाऱ्या दुसऱ्या एकीने गाडा झालेल्या दुसऱ्या एकीला पायाने ठोकरले.

**दैत्यायित्वा जहारान्यामेका कृष्णार्भभावनाम्।।**
**रिङ्गयामास काप्यङ्घ्री कर्षन्ती घोषनिःस्वनैः।।१६।।**

दैत्य झालेल्या एकीने कृष्णाच्या बालरूपाची भावना करणाऱ्या एकीला मारले. घुंगरांचा आवाज करीत पायांचे अंगठे ओढीत एक जण रांगायला लागली.

**कृष्णरामायिते द्वे तु गोपायन्त्यश्च काश्चन।।**
**वत्सायतीं हन्ति चान्या तत्रैका तु बकायतीम्।।१७।।**

दोघीजणी कृष्ण आणि बलरामाचे अनुकरण करू लागल्या. काही जणी गोप झाल्या. एकीने वत्सासुराचे अनुकरण करणाऱ्या दुसरीला मारले. दुसऱ्या एकीने बकासुराचे अनुकरण करणारीला मारले.

**आहूय दूरगा यद्वत्कृष्णस्तमनुवर्ततीम्।।**
**वेणुं क्वणन्तीं क्रीडन्तीमन्याः शंसन्ति साध्विति।।१८।।**

जसा कृष्ण (हाका मारी) त्याप्रमाणे दूर गेलेल्या गाईंना हाका मारून, कृष्णाचे अनुकरण करणाऱ्या, वेणू वाजवणाऱ्या, व खेळणाऱ्या एकीला बाकीच्या 'छान छान' म्हणून वाखाणू लागल्या.

**कस्यांचित्स्वभुजं न्यस्य चलन्त्याह परा ननु।।**

**कृष्णोऽहं पश्यत गतिं ललितामिति तन्मनाः।।१९।।**

कृष्णमय झालेली कुणी एक, दुसऱ्या एकीवर आपला हात ठेवून तिच्या मागोमाग चालता चालता म्हणू लागली, 'खरेच मी कृष्ण आहे, माझी सुंदर चाल पहा !'

**मा भैष्ट वातवर्षाभ्यां तत्त्राणं विहितं मया।।**

**इत्युक्त्वैकेन हस्तेन यतन्त्युन्निदधेऽम्बरम्।।२०।।**

'वारा आणि पावसाला तुम्ही घाबरू नका. त्यापासून मी तुमचे संरक्षण केले आहे'. असे म्हणून प्रयत्न करणाऱ्या तिने एका हाताने आपले वस्त्र वर उचलून धरले.

**आरुह्यैका पदाक्रम्य शिरस्याहापरां नृप।।**

**दुष्टाहे गच्छ जातोऽहं खलानां ननु दण्डधृक्।।२१।।**

हे राजा ! एक गोपी दुसरीच्या डोक्यावर चढून तिला पायाने दाबून म्हणाली, 'दुष्ट सर्पा जा. दुष्टांना शिक्षा करणारा मी प्रकट झालो आहे.'

**तत्रैकोवाच हे गोपा दावाग्निं पश्यतोल्बणम्।।**

**चक्षूंष्याश्वपिदध्वं वो विधास्ये क्षेममञ्जसा।।२२।।**

मग एक गोपी म्हणाली, हे गोपांनो ! हा भयंकर वणवा पहा ! पटकन डोळे मिटा. मी त्वरित तुमचे कल्याण करीन.

**बद्धान्यया स्रजा काचित्तन्वी तत्र उलूखले।।**

**भीता सुदृक् पिधायास्यं भेजे भीतिविडम्बनम्।।२३।।**

तेव्हा एका सुंदरीने भ्यायलेल्या दुसरीला माळेने उखळाला बांधले. सुंदर नेत्र असणाऱ्या तिने आपले मुख झाकून घेऊन भीतीचे अनुकरण केले.

----------

## अध्याय २, लावणी ३

**राग पीलू जिल्हा.**

**तिताल.**

**ऐसे ज्या पुसणाऱ्या वृंदावन तरुवल्लीला।।**
**हरिसि देखती वन प्रदेशी यदुपतिचरणाला।।धृ।।**
**स्पष्ट पदे ही पूज्य नंदसूनुचीच त्यावरती।।**
**सुलक्षणे ध्वजवज्रांकुशयवपंकजादि दिसती।।**
**त्या त्या चरणानी करणाऱ्या शोधाते युवती।।**
**तत्पदवीचे पुढे वधूच्या पदे करुन मिश्र ती।।**
**अवलोकुन मनि अतिशय पीडित होउनिया वदती।।**
**जिच्या नंदसूनुनेच अंसावर मणिबंधाप्रती।।**
**ठेउनि गेला तिचि कोणाची चरणे ही या स्थला।।**
**दिसती करिच्या सहकरणीची पदे जसी महिला।। ऐसे०।।१।।**
**ज्यास्तव सोडुन अह्मा प्रीत हरि येकांतीने जिला।।**
**इने पूजिला निश्चय हरि भगवान्प्रभू या स्थला।।**
**वाटे सखि अति पुण्यद हरिचे पदरेणू यांला।।**

धरिति शिरी विधि रमादेवि हर पापनाशनाला।।
ह्मणुन अह्मी ते मस्तकि ठेउन शमऊ दुःखाला।।
गोपीच्या सर्वस्वा हरुनी अच्युत अधराला।।
येकांती येकटी भोगि ते यास्तव आह्माला।।
तयेचीच ही चरणे करती परम क्षोभाला।।ऐसे०।।२।।
तिच्या न पाहुन येथे चरणा तृणांकुरेकरुनी।।
दुःखित मृदुपद्तला अशा प्रेयसी प्रती उचलुनी।।
घेता झाला प्रियकर निश्चय केला या स्थानी।।
प्रियेसाठि सुमनाचा चय केशववरद्प्रभुनी।।
प्रपदे आक्रम ज्याचे ऐशी पदे लोचनानी।।
दिसति पहा ही असकल कामी जो श्रीपति त्यानी।।
केले केशप्रसाधनचि त्या कामिनिचे या स्थला।।
सखीनिमित्तचि चूडासदृश गुंफित पुष्पांला।। ऐसे०।।३।।
असा निश्चये करुनि बसलासे या स्थानासी।।
अखंडीत जो आत्माराम हि रमे आपणासी।।
ऐसा कामी दैन्या तैसे स्त्रीदौरात्म्यासी।।
दर्शवीत हो रमे तये सह मुनिजनहृद्वासी।।
अन्य नारि सोडून वनी ज्या कृष्ण नेइ गोपिसी।।
विचेतसा दाखवीत फिरती ऐशा त्या तिजसी।।
तदा मानिती सर्व योषिता मधेच आपल्याला।।
श्रेष्ठ गोपि कामातुर टाकुन भजेचि प्रियकर मला।।ऐसे०।।४।।

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील २४-३६ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

कृष्णाला शोधत फिरणाऱ्या त्या गोपींना कृष्णाच्या पावलांचे ठसे दिसले. त्यांवरील सुलक्षणांवरून त्यांनी ते ओळखले. त्या पावलांवरून मागोवा घेता घेता त्यांना पुढे दिसले की कुणा युवतीचीही पावले त्याबरोबरच आहेत. तिच्या खांद्यावर आपले मनगट ठेवून हा चालला. बहुधा त्या म्हणू लागल्या, "आम्ही हरीसाठी व्याकूळ झालोत आणि ही एकटीच त्याच्यासह एकांतात गेली. त्यामुळे ही पावले बघून आम्हाला दुःखच होत आहे. हे पहा इथे हिची पाऊले दिसत नाहीत म्हणजे हरीने आपल्या प्रियतमेला उचलून खांद्यावर घेतले असावे. इथे टाचा उंचावल्यासारखे दिसत आहे, म्हणजे प्रियेसाठी केशवाला वर देणाऱ्या प्रभूने फुले काढून तिची केशभूषा केली असणार". तो अखंड आत्माराम असा तिच्यासह खेळू लागला. पण कामुक व्यक्तीचे दैन्य आणि स्त्रीस्वभावातला गर्विष्ठ अहंकार त्या सुंदरीत प्रकट झाला आणि तिच्या मनात आले इतर सर्व गोपींना सोडून प्रिय कृष्ण मलाच भजतो आहे !

**विवरण –**

- पहिल्याच कडव्यात दोन तीन चरण मिळून एक वाक्य होते. ते असे-

  त्या त्या चरणानी शोधाते करणाऱ्या युवती तत्पदवीचे
  पुढे वधूच्या पदेकरुनी ती मिश्र (पदे) अवलोकुन मनि
  अतिशय पीडित होऊनिया वदती.

- पदवी – पावलांचे एका ओळीतले ठसे.

- दुसऱ्या कडव्यातील शेवटच्या चरणातील अन्वय - गोपीच्या सर्वस्वा हरुनी अच्युत अधराला येकांती येकटीने भोगिते यास्तव तयेचीच ही चरणे आह्माला परमक्षोभाला करिती.
- तिसऱ्या कडव्यातील अन्वय - तृणांकुरेकरुनी दुःखित मृदुपदतला, अशा प्रेयसीप्रती, प्रियकर उचलुनी घेता झाला.
- प्रपदे आक्रम (= टाचा वर उंचावल्या,) ऐशी पदे लोचनानी दिसति.
- असकल - पदे हा शब्द येथे अध्याहृत. सकल म्हणजे पूर्ण. टाचा वर उचलल्यामुळे पावलाचा ठसा पूर्ण येत नाही, म्हणून अर्धवट उमटलेली पाऊले हा अर्थ.
- शेवटच्या चरणातील अन्वय - अन्या नारी वनी सोडून कृष्ण ज्या गोपिसी नेई तिजसी दाखवीत (इथे ती कृष्णासह चालली, इथे तिला कृष्णाने उचलिले, इथे तिला बसविले, इथे तिची वेणीफणी केली असे कल्पनेने दाखवून) विचेतसा (खिन्न) ऐशा त्या फिरती.

  तदा ती गोपी सर्व योषितामधे (सर्व स्त्रियांमधे) आपल्याला श्रेष्ठ मानी (कारण) (इतर गोपींना) टाकून कामातुर प्रियकर मला भजे.

या लावणीत ध्रुवपद व पुढे एकूण चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात आठ सयमक चरण आहेत. प्रत्येक कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना, ध्रुवपदाच्या सुरवातीची 'ऐसे' ही दोन अक्षरे उद्धृत करून दिली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची द्विपदी, कडव्याची द्विपदी आणि अंतऱ्यांचा चरण हे सर्व सममात्रिक असून प्रत्येकी २६ मात्रांचे आहेत. त्या सर्वांची मात्रा मांडणी पण समान असून ती प।प।प।—। अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील २४-३६ श्लोक (अर्थासहित) असे –

**एवं कृष्णं पृच्छमाना वृन्दावनलतास्तरून्।।**
**व्यचक्षत वनोद्देशे पदानि परमात्मनः।।२४।।**

अशा रीतीने वृंदावनातील वेलींकडे आणि झाडांकडे कृष्णाची चौकशी करणाऱ्या गोपींनी वनात एका ठिकाणी त्या परमात्म्याची पदचिन्हे पाहिली.

**पदानि व्यक्तमेतानि नन्दसूनोर्महात्मनः।।**
**लक्ष्यन्ते हि ध्वजाम्भोजवज्राङ्कुशयवादिभिः।।२५।।**

ध्वज, कमळ, वज्र, अंकुश, यव इ. चिन्हांमुळे नक्कीच ही पावले त्या थोर नंदपुत्राचीच असल्याचे दिसत आहे.

**तैस्तैः पदैस्तत्पदवीमन्विच्छन्त्योऽग्रतोऽबलाः।।**
**वध्वाः पदैः सुपृक्तानि विलोक्यार्ताः समब्रुवन्।।२६।।**

त्या त्या पावलांच्या मागोव्याने कृष्णाचा मार्ग शोधणाऱ्या त्या महिला पुढे पुढे ती पाऊले, कुणा स्त्रीच्या पावलांत मिसळलेली पाहून आर्त होऊन म्हणाल्या,

**कस्याः पदानि चैतानि याताया नन्दसूनुना।।**
**अंसन्यस्तप्रकोष्ठायाः करेणोः करिणा यथा।।२७।।**

जशी हत्तीबरोबर हत्तीण जावी, तशी नंदकुमाराबरोबर गेलेल्या आणि जिच्या खांद्यावर त्याने आपले मनगट ठेवले आहे, अशा कुणाची ही पाऊले बरे ?

**अनयाराधितो नूनं भगवान्हरिरीश्वरः।।**

**यन्नो विहाय गोविन्दः प्रीतो यामनयद्रहः।।२८।।**

खरोखर हिनेच भगवान् श्रीकृष्णांची आराधना केली असणार म्हणूनच आम्हाला सोडून तिच्यावर प्रेम करणाऱ्या हरीने तिला एकान्ती नेले.

**धन्या अहो अमी आल्यो गोविन्दाङ्घ्र्यब्जरेणवः।।**

**यान्ब्रह्मेशो रमादेवी दधुर्मूर्ध्न्यघनुत्तये।।२९।।**

अहो सख्यांनो ! गोविंदाच्या चरणकमळातील हे पराग धन्य होत, ज्यांना (साक्षात्) ब्रह्मदेव, शंकर आणि लक्ष्मीने पापनाशनासाठी आपल्या मस्तकी धारण केले.

**तस्या अमूनि नः क्षोभं कुर्वन्त्युच्चैः पदानि यत्।।**

**यैकापहृत्य गोपीनां रहो भुङ्क्तेऽच्युताधरम्।।३०।।**

तिची ही पाऊले आमच्या मनात तीव्र क्षोभ निर्माण करीत आहेत, जी एकटी गोपीच्या (सर्वस्व अशा अच्युताला) दूर नेऊन त्याच्या अधरामृताचे पान करीत आहे.

**न लक्ष्यन्ते पदान्यत्र तस्या नूनं तृणाङ्कुरैः।।**

**खिद्यत्सुजाताङ्घ्रितलामुन्निन्ये प्रेयसीं प्रियः।।३१।।**

इथे तिची पावले दिसत नाहीत. बहुधा कोवळ्या गवतामुळे तळवे दुखावलेल्या प्रेयसीला या प्रियकराने वर उचलून घेतले असावे.

**अत्रावरोपिता कान्ता पुष्पहेतोर्महात्मना।।**

**अत्र प्रसूनावचयः प्रियार्थे प्रेयसा कृतः।।**



**प्रपदाक्रमणे एते पश्यतासकले पदे।।३२।।**

इथे त्या थोर मनाच्या पुरुषाने फुलांसाठी प्रियेला खाली उतरविले असावे. इथे त्या प्रियकराने प्रियेसाठी फुले गोळा केली असावीत. टाचेच्या बाजूने वर उचलेली ही अर्धवट उमटलेली दोन पावले पहा.

**केशप्रसाधनं त्वत्र कामिन्याः कामिना कृतम्।।**

**तानि चूडयता कान्तामुपविष्टमिह ध्रुवम्।।३३।।**

इथे तर त्या प्रियकराने आपल्या सुंदरीचे केशप्रसाधन केले असावे. फुले, प्रियेच्या वेणीत माळणारा तो इथे बसला असावा.

**रेमे तया चात्मरत आत्मारामोऽप्यखण्डितः।।**

**कामिनां दर्शयन्दैन्यं स्त्रीणां चैव दुरात्मताम्।।३४।।**

तो सतत स्वतःच्या ठिकाणी रममाण होणारा आणि स्वतःच्या ठायी संतुष्ट असणारा असा असूनही कामी पुरुषाचे दैन्य आणि स्त्रियांचा कठोरपणा प्रकट करीत होता.

**इत्येवं दर्शयन्त्यस्ताश्चेरुर्गोप्यो विचेतसः।।**

**यां गोपीमनयत्कृष्णो विहायान्याः स्त्रियो वने।।३५।।**

**सा च मेने तदात्मानं वरिष्ठं सर्वयोषिताम्।।**

**हित्वा गोपीः कामयाना मामसौ भजते प्रियः।।३६।।**

विमनस्क अवस्थेतल्या त्या अशा प्रकारे मनोभाव प्रकट करीत करीत हिंडू लागल्या. इतर स्त्रियांना सोडून ज्या गोपीला कृष्णाने वनात नेले ती, 'इतर गोपींना सोडून माझी कामना करणारा हा मलाच भजत आहे' असे म्हणून स्वतःला इतर गोपींपेक्षा श्रेष्ठ मानू लागली.

----------

# अध्याय २, लावणी ४

## राग पूर्वी जिल्हा.

### तिताल.

तेव्हा ती तृप्ता गहनोद्देशाला।।
जाउनिया बोलति झालि नंदसूनुला।।धृ।।
चालाया मी न समर्थचि ने मजला।।
ज्या जागी मानस असे तुझे त्या स्थला।।
ऐकूनि असे वच यादवपति तिजला।।
स्कंधावर बस हे वदुन गुप्त जाहला।।
तेव्हा ती सुंदरि पावलि तापाला।।
हा नाथ प्रेष्ट प्राणपती घननिला।।
चा०।। कुठे कुठे तु आहे ही मि कृपण दासी।।
तुझि महाभुज सख्या प्रिया समिपतेसी।।
मज दाखिव श्रीशुक बोले महिपतिसी।।
चा०।। हरिमार्गाप्रति शोधिती अशा अबला।।
पावली प्रियाचा वियोग जी तिजला।। तेव्हा।।१।।
पाहती सखिसि दुःखित मोहित दुरुनी।।
हरिपासुन मानच दुरात्मतेपासुनी।।
अवमान पावली ऐशी मृगनयनी।।
कथियले तयेने त्याते ते ऐकुनी।।
पावती परम विस्मयाप्रती कामिनी।।

तदनंतर फिरती सर्व मिळुन काननी।।
चा०।। जो चंद्र चंद्रिका दिसत होति तो वनी।।
सिरलेला वृक्षछायेमधि जाणुनी।।
हरि युवति पर्तती कृष्णशोध टाकुनी।।
चा०।। होऊन तदात्मिक तन्मन चेष्टेला।।
त्याचेच तदालापासि करिति अबला।। तेव्हा।।२।।
तद्गुणा गाति निजगेहा स्मरति न मनी।।
हरिभावे युक्तचि कालिंदीपुलिनी।।
त्या पुनरपि येती येण्याची धरुनी।।
उत्कंठा मनि कृष्णासि गाति मिळुनी।।
जर करणे असते तुला असे तरि वनी।।
वेणुसी कशास्तव रजनीमधि फुंकुनी।।
चा०।। आमचेच हरिले मानस तू मोहुनी।।
तेव्हाचि मनि रति सुखेछेसि धरुनी।।
त्वत्पदारविंदाजवळ सर्व सोडुनी।।
चा०।। जाहलो प्राप्त तू पाहुनियां वदला।।
ठरु नये इथे जा तुह्मी मंदिराला।। तेव्हा।।३।।
कुलवधूसी उचितचि पतिच्या सेवेसी।।
करणे हो ह्मणुनी जा तुह्मि सदनासी।।
ऐकुनिया ऐशा हरिवचना दासी।।
जाहल्या सर्व त्या भग्नकाम मानसी।।

**अवनीवर होउन विकल पडति त्यासी।।**

**पाहुनिया रमवी मुनिजनहृद्वासी।।**

**चा०।। मग होती गर्वित समजुन हे श्रीहरी।।**

**जाहाला गुप्त मग तापुन त्या अनुचरी।।**

**धुंडिती काननी तो देखति सुंदरी।।**

**चा०।। तिज सहित येति कालिंदी पुलिनाला[।।]**

**विनविति त्या केशववरदश्रीपतिला।। तेव्हा।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील ३७-४४ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

ती गर्विष्ठ गोपी कृष्णाला म्हणाली, "मला आता चालवत नाही. तू आता मला घेऊन चल." "बस माझ्या खांद्यावर", असे म्हणून कृष्ण तिथून गुप्त झाला. मग तिला खूप पश्चात्ताप झाला आणि व्याकूळपणे ती कृष्णाला हाका मारू लागली. हरीला शोधत येणाऱ्यांनी आपली ही दुःखी मैत्रीण पाहिली. त्या दुःखी गोपीने सर्व वृत्तान्त सांगितला. मग सगळ्या मिळून कृष्णाला शोधू लागल्या. त्याचे गुणगान गाऊ लागल्या, आपले घरदार विसरल्या. जोवर चांदणे होते तोवर त्या वनात शोध घेत होत्या नंतर मग यमुनेच्या तीरावर येऊन त्याला आळवू लागल्या, 'कृष्णा तुला जर असे करायचे होते तर वेणू वाजवून आमचे चित्त हरून आम्हाला इथे का यायला लावलेस. घरदार सोडून आम्ही तुझ्या चरणी आलो तर तू म्हणालास इथे थांबू नका. घरी जा. पतिसेवा करा !' हे ऐकून त्या निराश झाल्या. दुःखावेगाने भूमीवर पडल्या. मग तो त्यांना रमवू लागला. पण त्यांना गर्व

झालेला पाहून गुप्त झाला. मग त्या त्याला शोधू लागल्या. त्याला शोधता शोधता सखी दिसली. तिला घेऊन त्या यमुना तीरी आल्या.

**विवरण** –

- ध्रुवपदात 'तृप्ता' असे 'ती' चे विशेषण आहे. मुळात दृप्ता = गर्विष्ठ असा शब्द आहे.
- पहिल्या कडव्यातील काही चरणांचा अन्वय असा –
  कुठे कुठे तु आहे ? मि ही तुझि कृपण दासी. (हे) महाभुज ! (हे) सख्या ! (हे) प्रिया ! समिपतेसि मज दाखिव.
- पहिल्या कडव्याचा शेवट आणि दुसऱ्याची सुरवात मिळून एक वाक्य होते, ते असे –
  हरिमार्गाप्रति शोधिती अशा अबला दुःखित मोहित सखिसि दुरुनी पाहती जी (सखी) प्रियाचा वियोग पावली तिजला.
- श्रीशुक बोले महिपतिसी (कडवे १) हा भाग मुळातला नाही.
- सुखेच्छेसि - सुखाच्या इच्छेला.
- तिसऱ्या कडव्याच्या सुरवातीचे वाक्य असे - हरिभावे युक्तचि उत्कंठा मनी धरुनी त्या पुनरपि कालिंदीपुलिनी येती. मिळुनी कृष्णासी गाती.
- या ठिकाणी खरे तर तिसाव्या अध्यायातील कथाभाग पूर्ण झाला आहे. मात्र इथून पुढचा भाग, रासक्रीडेच्या सुरवातीपासून पुन्हा यमुनातीरी येऊन गोपींनी कृष्णाची गाणी म्हणणे इथपर्यंत कसा कसा आला हे अगदी थोडक्यात सांगितले आहे. आणि हाही सगळा भाग गोपीमुखाने (म्हणजे त्या गाणे गात आहेत, त्याचा आशय म्हणून) सांगितला आहे.

या लावणीत ध्रुवपद व चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात सयमक असे ६/६ चरण असून पुढे ३ चरणांचा अंतरा व २ चरणांचा मेळ आहे. हे सर्व सयमक आहे. अंतरा व त्यानंतरचा मेळ यांच्या चालबदलाची सूचना ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना 'तेव्हा' अशी सुरवातीची अक्षरे उद्धृत करून दिली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची द्विपदी विषम मात्रासंख्येची आहे, म्हणजे अनुक्रमे २० व २१ मात्रांची असून त्यापैकी पहिल्या चरणाची मोडणी प।प।——। अशी असून दुसऱ्याची प।प।—⌣—। अशी दिसते.

कडव्याच्या द्विपदीचीही मात्रासंख्या अनुक्रमे २० आणि २१ असून त्यांची मोडणी अनुक्रमे प।प।⌣⌣—। आणि प।प।—⌣— अशी आहे.

अंतऱ्याचा एक चरण २१ मात्रांचा असून त्याची मोडणी ⌣—⌣—।प।⌣⌣⌣——। अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तिसाव्या अध्यायातील ३७-४४ श्लोक (अर्थासहित) असे –

**ततो गत्वा वनोद्देशं दृप्ता केशवमब्रवीत्।।**
**न पारयेऽहं चलितुं नय मां यत्र ते मनः।।३७।।**

वनातल्या एका भागात गेल्यावर गर्विष्ठ अशी ती कृष्णाला म्हणाली, 'मला चालवत नाही, तुला पाहिजे तिथे मला ने !'

**एवमुक्तः प्रियामाह स्कन्ध आरुह्यतामिति।।**
**ततश्चान्तर्दधे कृष्णः सा वधूरन्वतप्यत।।३८।।**

असे म्हटले गेल्यावर तो प्रियेला म्हणाला 'माझ्या खांद्यावर बस'. त्यानंतर कृष्ण अंतर्धान पावला. मग त्या स्त्रीला फार पश्चात्ताप झाला.

**हा नाथ रमण प्रेष्ठ क्वासि क्वासि महाभुज।।**

**दास्यास्ते कृपणाया मे सखे दर्शय संनिधिम्।।३९।।**

(ती म्हणाली) हे नाथा ! हे लाडक्या ! हे प्रिया ! हे महाशूरा ! तू कुठे आहेस ? हे सख्या या दीन दासीला तुझे सांनिध्य दाखव !

**अन्विच्छन्त्यो भगवतो मार्गं गोप्यो विदूरतः।।**

**ददृशुः प्रियविश्लेषमोहितां दुःखितां सखीम्।।४०।।**

भगवंताचा मार्ग शोधणाऱ्या गोपींना लांबूनच प्रियकराच्या वियोगाने भान हरपलेली आणि दुःखी कष्टी अशी आपली सखी दिसली.

**तया कथितमाकर्ण्य मानप्राप्तिं च माधवात्।।**

**अवमानं च दौरात्म्याद्विस्मयं परमं ययुः।।४१।।**

तिने सांगितलेला वृत्तान्त ऐकून, कृष्णापासून मिळालेला बहुमानाचा लाभ आणि स्वतःच्याच दुष्टपणामुळे झालेला अपमान ऐकून त्यांना फार आश्चर्य वाटले.

**ततोऽविशन्वनं चन्द्रज्योत्स्ना यावद्विभाव्यते।।**

**तमः प्रविष्टमालक्ष्य ततो निववृतुः स्त्रियः।।४२।।**

जोवर चंद्र प्रकाशत होता तोवर त्या स्त्रिया वनात शिरत राहिल्या. अंधार होऊ लागल्यावर त्या मागे फिरल्या.

**तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः।।**

**तद्गुणानेव गायन्त्यो नात्मागाराणि सस्मरुः।।४३।।**

त्याच्याकडेच मन लागलेल्या, त्याच्या विषयीच बोलणाऱ्या, त्याच्यासारखे हावभाव करणाऱ्या, त्याचेच गुण गाणाऱ्या त्यांना आपल्या घराचेही विस्मरण झाले.

**पुनः पुलिनमागत्य कालिन्द्याः कृष्णभावनाः।।**

**समवेता जगुः कृष्णं तदागमनकाङ्क्षिताः।।४४।।**

पुन्हा यमुनेच्या वाळवंटावर येऊन, कृष्णाच्या ठिकाणी भाव जडलेल्या त्या, कृष्ण येण्याची वाट पहात, एकत्र येऊन त्याचीच गाणी गाऊ लागल्या.

----------

## अध्याय ३, लावणी १

**राग देस सोरट जिल्हा.**

**तिताल.**

**बोलति सकल गोपजाया।।**

**हे पति जन्मानी तुझिया।।धृ।।**

**निश्चल व्रजि करि वासाला।।**

**इंदिरा त्यानि अधिक शोभला।।**

**सकलचि जन या गोष्ठाला।।**

**सुखामधि असती या अबला।।**

**चा०।। इतक्या धुंडिति दिशेप्रती तुला तुझे ठाई।।**

**प्राण ठेउनी ह्मणूनि सुख दे यासि दिसुन लवलायी।।**

**असे त्या विनविति यदुराया।। बोलति।।१।।**

शरदुदकाशयि सत झाली।।
जी सत्कमले फुललेली।।
सुंदर शोभा त्यांमधली।।
तुझिया नेत्रानी हरिली।।
चा०।। असती फुकट तुझ्या दासी मारियले यांला।।
त्याने वरदा सुरतनाथ हा नसे कि वध या स्थला।।
केशव वरद प्रभुराया।। बोलति।।२।।
वृषविषधरासुरांपासून।।
त्यापरि चपला दहनातून।।
मयात्मज निशाचरापासून।।
तैसे विषजलपानांतूं(तू)न।।
चा०।। वर्षवायुपासुन तैसे सकलचि भीतीतून।।
प्राणसख्या किति वेला आह्मा रक्षण केले असुन।।
आता तु न योग्य उपेक्षा या।। बोलति०।।३।।
नसे तू बालक गोपीचा[।।]
निश्चय करुनियां साचा।।
सकलचि शरिरी जे त्यांचा।।
असुसी साक्षी बुद्धिचा।।
चा०।। परमेष्ठी विनवित असता भक्तकुली सखया।।
उदय पावला विश्वरक्षणासाठि ह्मणुनि करि दया।।
आला यावरती पतिराया।। बोलति।।४।।

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील १-४ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

गोपी कृष्णाला म्हणतात, 'तुझ्यामुळे लक्ष्मी इथे व्रजात नांदते. सर्व स्त्रिया इथे सुखात आहेत. तुला या स्त्रिया दिशांदिशांत शोधत आहेत. त्यांना दर्शन दे. शरद ऋतूतल्या कमळांची शोभा तुझ्या नेत्रांना आहे. हे सुरतनाथा, ते कटाक्ष आमच्यावर टाकून तू आम्हाला घायाळ करतोस का ? हा आमचा वधच नाही का ? आत्तापर्यंत तू आम्हाला वेगवेगळ्या असुरांपासून, अग्नीपासून, विषापासून, अतिवृष्टी, वादळ यांपासून वाचवलेस. मग आता तू आमची उपेक्षा करणे योग्य नव्हे. तू काही फक्त यशोदेचाच बालक नाहीस तर सर्व प्राणिमात्रांचा अंतर्यामी साक्षी आहेस. ब्रह्मदेवाने विश्वरक्षणासाठी तुला प्रार्थना केली म्हणून तू भक्ताच्या कुळी अवतरलास. म्हणून या भक्तांवर दया कर.'

**विवरण –**

- शरदुकाशयि - शरद ऋतूतील सरोवरात (उदक आशय = पाण्याचा साठा)
- सत झाली - हे 'जात' (जन्माला आली) याचे अगदी शब्दशः भाषांतर आहे.
- भक्तकुली - भक्ताच्या कुळात (जन्म घेतला). मुळात सात्वतां कुले असे शब्द आहेत. वृष्णिमधले सात्वतांचे कुळ फार बलशाली व प्रसिद्ध होते.
- मुळातल्या 'हे दयित' (ज्याच्या मनात दया काठोकाठ भरलेली आहे असा) याचे भाषांतर 'हे पति' असे केले आहे.

या लावणीतील चार कडवी इतर लावण्यांच्या मानाने लहान आहेत. प्रत्येक कडव्यात चार चरण असून अंतरा दोनच दीर्घ चरणाचा आहे. त्यानंतर मेळ मात्र एकाच चरणाचा असून लगेच ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना, ध्रुवपदातील सुरवातीचा 'बोलति' हा शब्द आवृत्त करून केली आहे.

यापैकी ध्रुवपदाची द्विपदी समान १४ मात्रासंख्येची असून त्यांची मोडणी मात्र अनुक्रमे –।प।– – आणि –।प।⌣ ⌣ – अशी वेगळी आहे.

कडव्याच्या द्विपदीतील पहिला चरण १४ मात्रांचा असून –।प।– – अशी त्याची मोडणी असून दुसऱ्याच्या १६ मात्रांची मोडणी प।प। अशी आहे.

अंतऱ्याच्या एका चरणाच्या २४ मात्रांची मोडणी प।⌣ – ⌣ –।प।– अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील १-४ श्लोक (अर्थासहित) असे –

**।।गोप्य ऊचुः।।**

**जयति तेऽधिकं जन्मना व्रजः श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि।।**

**दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते।।१।।**

गोपी म्हणू लागल्या - हे कृष्णा प्रिया, तुझ्या जन्माने हे व्रज अधिक उत्कर्ष पावत आहे, कारण इथे लक्ष्मी आश्रय करून राहिली आहे. हे प्रिया, तुझ्या ठिकाणी प्राणच ठेवलेल्या तुझ्याच अशा गोपी दिशा दिशांत तुला शोधत आहेत पहा !

**शरदुदाशये साधुजातसत्सरसिजोदरश्रीमुषा दृशा।।**

**सुरतनाथ तेऽशुल्कदासिका वरद निघ्नतो नेह किं वधः।।२।।**

हे कामशास्त्रपटू श्रीकृष्णा ! शरद ऋतूतील सरोवरात सुंदर रीतीने फुलणाऱ्या चांगल्या कमळाच्या गाभ्याचे सौंदर्य असणाऱ्या तुझ्या नेत्रांनी, मूल्याशिवाय दास्य करणाऱ्या आम्हाला घायाळ करताना, हे वरदा ! हा वधच नाही का (तुझ्याकडून) होत ?

**विषजलाप्ययाद्व्यालराक्षसाद्वर्षमारुताद्वैद्युतानलात्।।**

**वृषमयात्मजाद्विश्वतो भयादृषभ ते वयं रक्षिता मुहुः।।३।।**

हे श्रेष्ठा ! विषमय जलाच्या संकटातून, अजगररूपी राक्षसापासून, पाऊस आणि वारा यापासून, वीजेच्या आगीपासून, बैलाचे रूप घेतलेल्या मयासुराच्या मुलापासून (व्योमासुरापासून) आणि सर्व ठिकाणच्या भीतीपासून तू आमचे वारंवार रक्षण केलेस.

**न खलु गोपिकानन्दनो भवानखिलदेहिनामन्तरात्मदृक्।।**

**विखनसाऽर्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान्सात्वतां कुले।।४।।**

हे सख्या ! तू फक्त यशोदेचाच मुलगा नाहीस तर ब्रह्मदेवानेही विश्वरक्षणासाठी प्रार्थिलेला, सात्वतांच्या कुळात जन्मास आलेला, सर्व प्राणिमात्रांच्या अन्तःकरणास पहाणारा आहेस !

----------

## अध्याय ३, लावणी २

### राग सारंगगौरी जिल्हा.

### तिताल.

भवभयापासुनी ज्यांनि दिले अभयाला।।
ऐशा त्या तुझिया वृष्णिधुर्य चरणाला।।धृ।।
श्रीकरग्रहच्चि कामद करपंकज याला।।
दे ठेउन आमचे शिरी कांत गोपाला।।
करि तुझे स्मित ध्वंसन निजजनगर्वाला।।
हे वीर सखे व्रजजनार्तिहर कामिनिला।।
भज तुझ्या दासि या दाव सुकमलमुखाला।।
जे करी प्रणत शरिऱ्याच्या अघशमनाला।।
चा०।। फणिफणार्पितच्चि जे पशुच्या मागे फिरते।।
श्रीनिकेतन तुझ्या अशा पादकमलाते।।
कुचि ठेउन अमच्या छेदन करि कामाते।।
चा०।। बुधमा(म)नोज्ञ मंजुल शब्द मधुर वाणीनी।।
तुझिया या किंकरि मोहित झाल्या ह्मणुनी।।
हे पंकजलोचन अधरपीयुषे करुनी।।
चा०।। हे वीर वाचवी विरहे मरती यांला।।
येवढे वेळ तरि कशा तुह्मी वाचला।। भवभया।।१।।
जे कविनी स्तविले देई जे शांतीला।।
तापल्या जना जे जीवन अघशमनाला।।

करि तैसे जे दे श्रवणे कल्याणाला।।
जे गाति विस्तरे तुझियां कथामृताला।।
अवनीवर ते जन करिति बहुत दानाला।।
परिसिले असे तें ह्मणुनि वाचलो सकला।।
चा०।। भेटून तुह्माप्रति अता काय तरि करणे।।
प्रेमेक्षण तैसे जे मोठ्यानी हसणे।।
येकांति मनोहर विनोदयुत जे वदणे।।
चा०।। जे विहरण मंगल करीतसे ध्यानानी।।
करि जास्तव ते क्षोभासि आमच्या मनी।।
हे करणे योग्य न कपट्या तुज ऐशानी।।
चा०।। प्रेमार्द्र चित्त आमचे अती गोपाला।।
तुज ठायि असुनि कां करि यासी कपटाला।। भवभया।।२।।
जा वेळि व्रजातुन जासी पशु चाराया।।
त्या समइ तुझे नलिनवत्सुपद पतिराया।।
शिल तृणांकुरानी दुखे नाथ प्रिय सखया।।
ह्मणुनिया पावते अमचे मन क्लेशा या।।
त्या पीडाशंके असता व्याकुल काया।।
परतून येसि तू सायान्ही त्या समया।।
चा०।। घन रजस्वलचि जे युक्त नीलकेशानी।।
त्या ऐशा पंकजवदना धारण करुनी।।
फिरफिरुन दाखवित अर्पिसि हे वीर मनी।।

चा०।। आमच्या स्मराते देसि न तू संगाला।।
अस(से) असून केशव वरद प्रभु आह्माला।।
निजभक्तकामकल्पद्रुम तू गोपाला।।
चा०।। अससीच ह्मणुनि हे करि सोडुनि कपटाला।।
कमलज्या(जा)र्चिंतचि जे देइ प्रणतकामाला।। भवभया।।३।।
ध्यानासि योग्य आपदी सुमंडन महिते।।
जे शंतम ऐशा तुझ्या चरणकमलाते।।
कुचि ठेवि आमच्या रम आधिहर सुरते।।
वाढवी सुरत त्यापरि नाशी शोकाते।।
सुस्वरित वेणुने सुंदर चुंबित जे ते।।
मानवाप्रती विसरवी इतर प्रीतीते।।
चा०।। हे वीर सखे ते अधरामृत दे याला।।
दिवसासि जासि जा वेळे तू गहनाला।।
हे प्राणसख्या तेव्हा न पाहता तुजला।।
चा०।। त्रुटिकाल जातसे युगा परी सर्वाला।।
काननातून परतून येसि त्या काला।।
त्वत्कुठि(टि)लकुंतल श्रीमुखराजीवाला।।
चा०।। पाहती उंच जे त्याचे ही नयनाला।।
करि पक्ष्मचि तो जड असे बोलती सकला।।भवभया।।४।।

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील ५-१५ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

'हे वृष्णिश्रेष्ठा, भवभयापासून अभय देणारे तुझे चरण आणि करकमळ आमच्या मस्तकी ठेव. तुझे मुखकमल दाखव. कालियाच्या डोक्यावर ठेवलेले, गाईंच्या मागे फिरणारे तुझे चरण आमच्या स्तनांवर ठेव आणि आमच्या मनातल्या कामाचा उच्छेद कर. देवांनाही भुरळ घालणाऱ्या तुझ्या मधुर वाणीने आम्ही तुझ्या दासी मोहित झालो आहोत. आम्ही तुझ्या विरहाने मरू लागलो आहोत. तुझ्या अधरामृताने आम्हास वाचव. तुझे कथामृत आम्ही ऐकत आलो म्हणून आम्ही एवढा वेळ जिवंत राहिलो. तुझे हसणे, प्रेमयुक्त कटाक्ष टाकणे, विहरणे यामुळे आमचा क्षोभ वाढत आहे. आमचे प्रेमार्द्र मन तुझ्या ठायी आहे. तू असा कपटाने वागू नकोस. तू गाई घेऊन रानात जायचास तेव्हा तुझ्या कोमल पायांना काटे टोचत असतील म्हणून आमचे मन दुःखी होई. संध्याकाळी धुळीने माखलेले, तुझे मुखकमल पाहता आमच्या मनात तीव्र व्याकुळता दाटून येत असे. तू भक्तांचा कल्पतरु आहेस. म्हणून हे कपट सोड. तुझे शांती देणारे चरणकमळ आमच्या स्तनांवर ठेव. आमच्यातील काम उद्दीपित कर आणि शोक नष्ट कर. माणसाला इतर सगळे विसरायला लावणारे ते अधरामृत दे. तू वनात जातोस तेव्हा क्षणांश सुद्धा आम्हाला युगासारखा भासतो. आणि तू परत येतोस तेव्हा तुझे मुखकमळ बघणाऱ्या डोळ्यांना पापण्या लावणारा तो ब्रह्मदेव आम्हाला निर्बुद्धच वाटतो'.

**विवरण –**

- शरीऱ्याच्या - 'शरीरी' म्हणजे प्राणिमात्र याचे मराठी पद्धतीने केलेल षष्ठी ए. व. (उदा. सगळे सगळ्याच्या)

- ..मानोज्ञ - हे 'मनोज्ञ' चे अनवधानाने झालेले शब्दरूप आहे. मुळातही 'मनोज्ञ' असेच आहे.
- एवढा वेळ तरी कशा तुम्ही वाचला (पहिल्या कडव्याची शेवटची ओळ) हे ज्याचं भाषांतर म्हणता येईल अशी कोणतीही संस्कृत ओळ मुळात नाही. पण मुळातल्या भागवतातील रास पंचाध्यायीचा अर्थ विशद करणाऱ्या व्याख्याकाराच्या भूमिकेने कवीने ही ओळ घातली आहे. मुळात गोपी स्वतःला 'मुह्यतीः' शुद्ध हरपत चाललेल्या असे म्हणत आहेत. त्यापूर्वी त्या कृष्णाला म्हणाल्या तू आम्हाला नेत्रकटाक्षाने 'निघ्नतः' मारतोस, हा आमचा वधच नाही का ?

साहजिकच वरील वचन कृष्णाच्या मुखाने त्या स्वतःला विचारून घेत आहेत.

ही ओळ घातल्यामुळे पुढील आशय सुसंगत ठरला आहे. पुढे असे म्हटले आहे की कृष्णाचे कथामृत हे तप्त (= व्याकूल झालेल्यांना) संजीवक आहे. जे हे गातात ते पृथ्वीवरचे 'महादानी' (भूरिदाः) म्हणायचे. असे महादानी आम्हाला तुझे कथामृत ऐकवतात. परिसले (=ऐकले) असे जे म्हणुन वाचलो सदया !

- पतिराया - नाथ या मुळातल्या शब्दाचा अनुवाद.
- शिलतृणांकुर - शिल म्हणजे धान्य कापल्यावर जमिनीवर रहाणारे बुडखे. म्हणून गवताचे टोकदार बुडखे असा अभिप्राय.
- घन रजस्वल - (रजस् = धूळ) दाट धुळीने माखलेले.

- तिसऱ्या कडव्यातील अंतऱ्याचा अन्वय- जे घन रजस्वलचि, नीलकेशानी युक्त जे, ऐशा पंकजवदना धारण करुनी फिरफिरुन (पुन्हा पुन्हा) दाखवीत, हे वीर, आमच्या मनी स्मरातें (काम भावनेला) अर्पिसि, (पण) आह्माला संगाला (सहवास) न देसि.
- हे गोपाळा निजभक्तकामकल्पद्रुम तू असिस म्हणुनि कपटाला सोडुनि हे करि.
- बासरीच्या सुरांची मोहिनी घालून गोपींना घरदार सोडून रात्रीच्या वेळी वनात यायला भाग पाडले आणि मग आपण गुप्त झाला, यात काही कावा असावा असा गोपींचा अभिप्राय.
- कमलज्यार्चित = कमलजा (कमळातून प्रकट झालेली) म्हणजे लक्ष्मी, तिने पूजित.

  म्हणून येथे 'कमलजा' असा मूळ संस्कृत शब्द आहे. संस्कृत तालव्य मराठी कानाला 'य' युक्त जोडाक्षर वाटणे शक्य आहे. संस्कृत 'जा' – मराठी 'ज्या', संस्कृत 'चा' – मराठी 'च्या'. उलट जिथे 'ज्या' हवे तिथे नुसते 'जा' आढळते. उदा. जावेळे = ज्यावेळी.
- वाठवी - हा शब्द वाढवी असावा.
- त्रुटि - लहानात लहान काळाचे परिमाण. निमेषाचा १/४ भाग (निमेष = सहज पापणी मिटायला लागणारा कालावधी).
- कुटिल कुंतल - कुरळे केस.

या लावणीत ध्रुवपद व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात ६ सयमक चरण आणि ३ चरणांचे दोन अंतरे हे या लावणी रचनेचे वैशिष्ट्य आहे. शेवटी दोन चरणांची मळ अशी रचना आहे. दोन्ही अंतऱ्यांसाठी

आणि शेवटच्या मेळासाठी असलेला चाल बदल ।।चा०।। असे म्हणून सुचविला आहे. कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाचे आवर्तन ध्रुवपदातली 'भवभय' ही अक्षरे उद्धृत करून सुचविले आहे.

यापैकी ध्रुवपदाची द्विपदी २२ मात्रांची अशी असून तिच्या चरणांची मात्रा मोडणी मात्र अनुक्रमे ‿ ‿।प।प।– – आणि प।–।प।– – अशी वेगवेगळी आहे.

कडव्याच्या द्विपदीत अनुक्रमे २१ आणि २३ मात्रांचे चरण असून त्यांची मोडणी अनुक्रमे –।प।‿ ‿ ‿।प। आणि प।प।‿ – – –। अशी दिसते.

यातल्या दोन्ही अंतऱ्यांचील प्रत्येक चरण २२ मात्रांचा आहे. अंतऱ्याच्या चरणाच्या २२ मात्रांची मोडणी प।–।प।‿ ‿ –। अशी आहे. दुसऱ्या अंतऱ्याच्या २२ मात्रांची मोडणी ‿ ‿।प।प।– –। अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील ५-१५ श्लोक (अर्थासहित) असे –

**विरचिताभयं वृष्णिधुर्य ते चरणमीयुषां संसृतेर्भयात्।।**
**करसरोरुहं कान्त कामदं शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम्।।५।।**

हे वृष्णींच्या कुळातील श्रेष्ठ पुरुषा ! संसाराच्या भयामुळे तुझ्या पायापाशी आलेल्यांना तू अभय देतोस. हे प्रिया ! इष्ट फळ देणारे, लक्ष्मीचे पाणिग्रहण करणारे तुझे करकमळ आमच्या मस्तकी ठेव !



**व्रजजनार्तिहन्वीर योषितां निजजनस्मयध्वंसनस्मित।।**

**भज सखे भवत्किंकरीः स्म नो जलरुहाननं चारु दर्शय।।६।।**

व्रजवासी जनांच्या दुःखांचा नाश करणाऱ्या वीरा ! आपल्या लोकांच्या गर्वाचा नाश करणारे तुझे स्मित ! (आम्हा) स्त्रियांचा तू स्वीकार कर ! आम्ही तुझ्या दासी आहोत. तुझे सुंदर कमलमुख आम्हाला दाखव !

**प्रणतदेहिनां पापकर्शनं तृणचरानुगं श्रीनिकेतनम्।।**
**फणिफणार्पितं ते पदाम्बुजं कृणु कुचेषु नः कृन्धि हृच्छयम्।।७।।**

तुझ्या ठायी नम्र झालेल्यांच्या पापांचा नाश करणारे, गवत चरणाऱ्या गाईंच्या मागोमाग जाणारे, सर्पाच्या फण्यावर ठेवलेले, सौंदर्याचे वसतिस्थान असणारे, तुझे चरणकमळ आमच्या स्तनांवर ठेव आणि आमच्या हृदयातील कामाला छेदून टाक.

**मधुरया गिरा वल्गुवाक्यया बुधमनोज्ञया पुष्करेक्षण।।**
**विधिकरीरिमा वीर मुह्यतीरधरसीधुनाप्याययस्व नः।।८।।**

हे कमलनयना ! ज्ञानी जनांना आवडणाऱ्या, सुंदर शब्द असणाऱ्या तुझ्या मधुर वाणीने मोहित झालेल्या या आम्हा दासींना अधरामृताने सचेत कर !

**तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम्।।**
**श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः।।९।।**

दुःखितांना जीवन देणारे, कवींनी स्तविलेले, पापांचा नाश करणारे, ऐकणाऱ्याला मंगलदायी असे, सौंदर्ययुक्त, विस्तृत असे तुझे कथामृत जे या जगात गातात ते खरोखर विपूल दान देणारे होते !

**प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं विहरणं च ते ध्यानमङ्गलम्।।**
**रहसि संविदो या हृदिस्पृशः कुहक नो मनः क्षोभयन्ति हि।।१०।।**

हे प्रिया ! तुझे हसणे, प्रेमाने पहाणे, विहार करणे हे ध्यानासाठी मंगलकारक आहे. अरे धूर्ता ! आमच्या अन्तःकरणाला हात घालणारी एकान्तामधील तुझी भाषणे आमच्या मनाला क्षुब्ध करीत आहेत.

**चलसि यद्व्रजाच्चारयन्पशून्नलिनसुन्दरं नाथ ते पदम्।।**
**शिलतृणाङ्कुरैः सीदतीति नः कलिलतां मनः कान्त गच्छति।।११।।**

हे नाथा ! हे प्रिया ! पशूंना चारण्यासाठी तू व्रजातून बाहेर पडतोस तेव्हा कापलेल्या गवताचे बुडख्यांनी तुझ्या कमळासारख्या सुंदर पायांना वेदना होतील, असे वाटून आमचे मन व्याकूळ पावते.

**दिनपरिक्षये नीलकुन्तलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम्।।**
**घनरजस्वलं दर्शयन्मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि।।१२।।**

काळ्याभोर केसांनी आच्छादलेले, दाट धुळीने माखलेले असे मुखकमल दाखवीत संध्याकाळी (घरी जाताना) हे वीरा, तू आमच्या मनात मदनाला स्थापित करतोस.

**प्रणतकामदं पद्मजार्चितं धरणिमण्डनं ध्येयमापदि।।**
**चरणपङ्कजं शंतमं च ते रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन्।।१३।।**

हे मनोव्यथा नष्ट करणाऱ्या प्रिया ! नम्र झालेल्यांच्या कामना पूर्ण करणारे, लक्ष्मीने पूजलेले, भूमीला भूषण असणारे, संकटकाळी ज्याचे ध्यान करावे असे, कल्याणकारी असे तुझे चरणकमळ तू आमच्या स्तनांवर ठेव.

**सुरतवर्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुम्बितम्।।**
**इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेऽधरामृतम्।।१४।।**

हे वीरा ! (आमच्या मनातील) काम वाढविणारे, शोकाचा नाश करणारे, वाजणाऱ्या वेणूने छान चुंबिलेले, माणसांना इतर आसक्तींचा विसर पाडणारे तुझे अधरामृत तू आम्हाला दे.

**अटति यद्भवानह्नि काननं त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम्।।**

**कुटिलकुन्तलं श्रीमुखं च ते जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दृशाम्।।१५।।**

तू जे दिवसा वनात फिरतोस, तेव्हा तुला न पहाणाऱ्या आम्हाला चुटकीसारखा काळही युगासारखा वाटते. कुरळे केस असणारे तुझे सुंदर मुख टक लावून पहाताना डोळ्यांना पापण्या करणारा तो (ब्रह्मदेव) मूर्खच वाटतो !

----------

## अध्याय ३, लावणी ३

**राग वृंदावनी सारंग जिल्हा.**

**तिताल.**

**पति सुतादि बांधव बंधू।।**

**प्रति सोडुनि अच्युत तुझिया।।धृ।।**

**उद्गीते मोहित ऐशा।।**

**रमणीय तरुण ज्या युवती।।**

**आलेल्या संनिध याच्या।।**

**येण्यासी जाणुन चित्ती।।**

**तुजविनाचि सोडील धूर्ता।।**



**रजनीत कोण येकांती।।**

चा०।। आह्मासि हृदामय झाला।।

त्यजिले तु ह्मणुनि शमनाला।।

करि दर्शन देउं(उ)नि यांला।।

चा०।। सुखवीच आता पतिराया।। पति सु०।।१।।

प्रेमानी वीक्षण जे त्या।।

जे विनोद येकांताचे।।

त्या तुझिया प्रहसितवदनां।।

बुज जे त्या धाम रमेचे।।

जे बृहदुर त्या अह्मि मदनो।।

दय ऐसे पाहुन अमचे।।

चा०।। सकलाचे मन फिरफिरूनी।।

अति इछे प्रति मोहूनी।।

करितसेचि हे पति ह्मणूनी।।

[चा०]दे आता रतिसुख सदया।। पति सु०।।२।।

जगमंगल प्रभु तुझि मूर्ती।।

व्रजविपिनौकसवृजिनाला।।

हरणारि असे तुझि इछा।।

करणाऱ्या जा अह्मी यांला।।

स्वजनाच्या हृद्रोगाचे।।

जे नाशक औषध त्याला।।

चा०।। तुज ठाउक आहे म्हणुनी।।

कृपणते प्रती सोडूनी।।
काहिसे टाकि देऊनी।।
[चा०]या समइ आता पतिराया।। पति सु०।।३।।
अति सुंदर मृदुल तुझे जे।।
चरणांबुज त्या भीतीनी।।
हलकेचि ठेवितो आह्मी।।
प्रियसखया कर्कश थानी।।
तेणेचि जासि अटवीते।।
कूर्पादिक रुतती त्यानी।।
चा०।। का पीडित होइन यांचा।।
अससी तू प्राणचि साचा।।
ह्मणुनिया आमचे धीचा।।
चा०।। भ्रम जाइन हे यदुराया।। पति सु०।।४।।
तू रात्री मुरलीगाने।।
हरिले मन मोहुनि ह्मणुनी।।
गृहकृत्ये टाकुनि आलो।।
अह्मि तुझ्या जवल(ळ) हरि गहनी।।
बोललासि तू पाहुनीया।।
जा सत्वर सखिनो सदनी।।
चा०।। हे ऐकुन व्याकुल होऊन।।
पडलो अह्मि हे तू पाहून।।

कालिंदीपुलिनी जाऊन।।

चा०।। रमविलेसि हे प्रिय सखया [।। पति सु०]।।५।।

त्या समइ सकल व्रजनारी।।

जाहल्याचि गर्वितयाते।।

अवलोकुन अंतर्हित तू।।

जाहालासि मग गहनाते।।

तुज धुंडित फिरती पुसती।।

या सुंदरि तरुवल्लीते।।

चा०।। त्वत्लीला करिता युवती।।

वधु पदे करुन मिश्रित ती।।

हरिचरणे पाहुन होती।।

चा०।। मनि दुःखित अतिशय सदया [।। पति सु०]।।६।।

वनि पदे न पाहता सखिची।।

तर्कासि करिति त्या तिजला।।

उचलून कडेवर घेऊन।।

तिजसाठि इथे सुमनाला।।

वेचून गुफुनी वेणी।।

रमविलेचि हरिनी सखीला।।

चा०।। मनि वाटे ऐसे ह्मणती।।

तो सखिसी दुःखित पाहती।।

मग विव्हाळून तिज होती।।

**चा०।। अतिविस्मित सकलचि जाया।। पति सु०।।७।।**

**तदनंतर सकल हि अबला।।**

**वनि चंद्रचंद्रिका नयनी।।**

**जो दिसत होति तो फिरती।।**

**भेटे ना प्रिय पति ह्मणूनी।।**

**त्या पर्तति केशववरद [।।]**

**श्रीपतिच्या भावे करुनी।।**

**चा०।। होऊन युक्त नदिपुलीनी।।**

**तद्गुणा गाति येऊनी।।**

**सकल ही पडति होऊनी।।**

**[चा०]अति विव्हल महिवरि जाया।। पतिसु०।।८।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील १६-१९ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

'पती, मुलेबाळे, नातेवाईक सर्वांना सोडून, तुझ्या गाण्यामुळे मोहून जाऊन सुंदर युवती तुझ्याजवळ आल्या. रात्रीच्या वेळी कोण धूर्त त्यांना असे एकांती सोडून जाईल ? आमच्या मनात उसळलेल्या कामाला तू शांत कर. तुझे प्रेमाने पाहणे, एकांतातील तुझे विनोद, तुझे वदनकमळ यामुळे आमचे मन पुन्हा पुन्हा तुझ्याकडे येत आहे. हे पतिराया, तू आम्हाला रतिसुख दे. आमच्या ठायी उसळलेल्या कामरोगाला तू आता औषध देऊन टाक. तू आमचा प्राण आहेस. तुझ्या कोमल चरणाला इजा होऊ नये म्हणून आम्ही ते हलकेच आमच्या उरोजावर ठेवतो. तू रात्री

तुझ्या मुरलीने मोहित केलेस. आम्ही संसार टाकून आलो. मग तू आम्हाला घरी जा म्हणालास. आम्ही व्याकूळ झालो. मग तू आम्हाला यमुनेच्या तीरी नेऊन रमविलेस. त्यामुळे आम्हाला गर्व झाला. मग तू अंतर्धान पावलास. मग तुला शोधीत, झाडाझुडपांना विचारीत, तुझ्या लीला करीत आम्ही व्रजनारी फिरू लागलो. पण एका युवतीची पावले हरीच्या पावलांत मिसळलेली पाहून गोपी तर्क करू लागल्या. बहुधा कृष्ण सखीला खांद्यावर घेऊन येथून गेला असावा. फुलांच्या हारांनी तिची केशभूषा केली असावी. असा विचार करून पुढे जातात. तो त्यांना तीच दुःखित सखी दिसली. तिने तिचा सर्व वृत्तान्त सांगितल्यावर बाकीच्या गोपी अचंबित होतात. मग चांदणे असे पर्यंत त्या सगळ्या कृष्णाला वनात शोधतात आणि शेवटी यमुनेच्या वाळवंटी येऊन त्याचे गुणगान करू लागतात आणि अति विव्हळ होऊन भान हरपून भूमीवर पडतात.

**विवरण** –

- हृदामय – (आमय = रोग) हृदयात उफाळलेला काम.
- पतिराया हे संबोधन या ठिकाणी मुळात नाही. मुळात अच्युत.
- दुसऱ्या कडव्यात वदनांबुज हा शब्दच तोडून दोन चरणात आला आहे. वदनां।।बुज
- तसेच मदनोदय हा शब्दही मदनो।।दय असा दोन चरणात तोडून बसवला आहे.
- इछा - इच्छा
- तिसऱ्या कडव्याअंतीचे पतिराया हे संबोधन ही कवीची जोड आहे.
- कूर्पादिक – दगडाच्या धारदार खापऱ्या इ.

- चौथ्या कडव्यातील अन्वय - तेणेंचि (=त्या कोमल चरणकमलांनी) अटवीते (=वनात) जासी कूर्पादिक रुतती. त्यानी (ते चरण) पीडित होईन का (=होतील का ?) याचा आमचे धीचा (=बुद्धीला) भ्रम होईन (=होईल) (कारण) तू प्राणसखा म्हणुनिया.
- पर्तती - परत येती.
- शेवटच्या कडव्यात त्या पर्तति केशववरदश्रीपतिच्या भावे करुनी।। असे सलग दिले आहे. अपेक्षित अर्थाच्या दृष्टीने ते योग्य आहे मात्र चरण मोडणीच्या दृष्टीने त्या पर्तति केशववरद इथे एक चरण संपतो म्हणून तेथे संपादकीय परिष्करण म्हणून [।।] असे चरणदंड घातले आहेत.

ध्रुवपद व पुढे आठ कडवी या लावणीत आहेत. प्रत्येक कडव्यात ६ चरण, ३ चरणांचा अंतरा आणि पुढे एकाच चरणाचा मेळ आहे. कडव्यातील सम चरण (दुसरा, चौथा व सहावा हे) यमकसाधित आहेत. त्याच्याशी ध्रुवपद जोडून घेण्याची सूचना कडव्याच्या शेवटी ध्रुवपदातील सुरवातीची पतिसु ही अक्षरे आवृत्त करून केली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची तसेच कडव्याची द्विपदी आणि अंतऱ्याचा चरण सर्व सममात्रिक असून प्रत्येकी १४ मात्रासंख्येचे आहे. मात्र प्रत्येकातील मात्रांचा रचनाक्रम वेगवेगळा आहे. तो असा-

ध्रुवपदाच्या द्विपदीची अनुक्रमे ⌣ ⌣।प।– –। आणि ⌣ ⌣।प।⌣ ⌣ –। अशी मोडणी आहे. कडव्याच्या दोन चरणांची मोडणी अनुक्रमे – – – ।प। आणि प।– ⌣ ⌣ –। अशी आहे.

अंतऱ्याच्या चरणाच्या मात्रा प।⌣ ⌣ – – अशा रचनाक्रमाने आहेत.

३१ व्या अध्यायातील १६ ते १९ हा विषय चौथ्या कडव्यातच पूर्ण झाला आहे. त्यानंतरची ५,६,७ व ८ ही कडवी २९ व्या अध्यायातील कथावस्तूपासून सुरवात करून प्रस्तुत लावणीच्या सुरवातीला आणून भिडविली आहे.

संस्कृत टीकाकार दोन श्लोकांमधील, दोन अध्यायांतील, दोन सूत्रांतील संगती लावून दाखविणे महत्त्वाचे मानतात. मागच्या अध्यायातून पुढचा कसा स्वाभाविक संबंधाने निघाला आहे, हे दाखविण्याचे विशेष कष्ट घेतात. ५ ते ८ या कडव्यांतील आशय हे संगती भाष्यच आहे. फक्त ते तिसऱ्या अध्यायाच्या सुरवातीस नसून शेवटी आहे आणि त्याचा अभिप्राय असा की बोलती सकल गोप जाया अशी तिसऱ्या अध्यायाची (लावणी १) सुरवात आहे. गोपी अशा बोलायला प्रसंग काय घडला ? तर तेच ५ ते ८ कडव्यातून उलगडून दाखविले आहे. नव्या अध्यायाच्या पूर्वी मागील अध्यायाची उजळणी यामुळे आपोआप होते. त्यामुळे याला 'अनुसंधानभाष्य' असेही म्हणता येईल.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील एकतिसाव्या अध्यायातील १६-१९ श्लोक (अर्थासहित) असे –

**पतिसुतान्वयभ्रातृबान्धवानतिविलङ्घ्य तेऽन्त्यच्युतागताः।।**
**गतिविदस्तवोद्गीतमोहिताः कितव योषितः कस्त्यजेन्निशि।।१६।।**

हे धूर्त कृष्णा ! आमची गती जाणणाऱ्या तुझ्या उच्च आवाजातील गीताने मोहित झालेल्या आणि पति, पुत्र, कुळ, भाऊ आप्तस्वकीय यांना मागे

टाकून तुझ्या जवळ आलेल्या आम्हा स्त्रियांचा रात्रीच्या वेळेस कोण त्याग करेल ?

**रहसि संविदं हृच्छयोदयं प्रहसिताननं प्रेमवीक्षणम्।।**
**बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते मुहुरतिस्पृहा मुह्यते मनः।।१७।।**

मदनाला उत्पन्न करणारे एकांतातील भाषण, तुझे हांसरे मुख, प्रेमपूर्ण कटाक्ष, लक्ष्मीचे स्थान असणारे विशाल वक्षस्थल पाहून तुझ्याप्रती प्रबळ इच्छा निर्माण होते आणि मन वारंवार बेहोष पडते.

**व्रजवनौकसां व्यक्तिरङ्ग ते वृजिनहन्त्र्यलं विश्वमङ्गलम्।।**
**त्यज मनाक्च नस्त्वत्स्पृहात्मनां स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम्।।१८।।**

अरे ! गोकुळातल्या आणि वृंदावनातल्या लोकांचे पाप नष्ट करणारा तुझा अवतार आहे. आणि तू विश्वाचे परिपूर्ण कल्याण आहेस. मनात तुझी कामना बाळगणाऱ्या आम्हाला स्वजनांच्या अन्तःकरणातील रोगाला नाहीसे करणारे काही थोडेसे दे.

**यत्ते सुजात चरणाम्बुरुहं स्तनेषु**
**भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु।।**
**तेनाटवीमटसि तद्व्यथते न किंस्वित्**
**कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः।।१९।।**

हे सुकुमारा ! हे प्रिया ! भीतभीतच तुझे चरणकमल आमच्या कठीण स्तनांवर ठेवतो ! अरण्यात तू फिरतोस तेव्हा दगडांच्या कपऱ्या इत्यादिकांनी त्यांना क्लेश होत नसतील काय ? असे वाटून तूच प्राण असणाऱ्या आमची बुद्धी गोंधळून जाते.

## अध्याय ४, लावणी १

### राग झींजोटीगारा जिल्हा.

### तिताल.

श्रीशुक बोले राजा ऐसे श्रीहरिदर्शन इछेला।।
करिति अशा मोठ्यानी गाती कितिक तऱ्हे प्रलपति अबला।।धृ।।
सुस्वर रडती हसित मुखांबुज जो पीतांबर स्त्रग्धारी।।
साक्षान्मन्मथमन्मथ ऐसा प्रकट जाहला त्यास हरी।।
आलेल्या त्या प्रेष्ठा पाहुन प्रेमे विकसितदृश नारी।।
येकदाच त्या उठती सकला गत प्राण येउन शरिरी।।
करचरणादिक जैसे मोदे कोणि हरीचे ग्रहण करी।।
करांबुजा अंजलिने चंदनभूषित तद्बाहूसि धरी।।
कोणि अंसि घे दो करि कोणी चर्चि(र्वि)त तांबूला अबला।।
तप्त येक सुंदरी ठेविती झाली कुची तत्पदकमला।।[श्रीशुक०]१।।
प्रेमाच्या संरंभे विव्हल जी ती ओष्ठा दशनानी।।
चावि येक हो भृकुटी फिरउन मारि कटाक्षे पाहूनी।।
त्याच्या वदनांबुजासि अन्या सेवी स्तब्धचि नयनानी।।
पान करित असताही तृप्त न जसे तत्पदा संत मुनी।।
कोणि नेत्ररंध्रे त्या हृदयी धरून लोचन झाकूनी।।
पुलकांगी अशि परिरंभानी मोदे संप्लुत होऊनी।।
राहि योगि परि हरि पाहुनि त्यां परमोत्साहे सुखि सकला।।
टाकिति विरहज तापाते जन जसे भेटता प्राज्ञाला।। श्रीशुक०।।२।।

**जानि धूतले शोक तयानी आवृत अधिकचि शोभूनी।।**
**भगवानच्युत असे नरपती जसा पुरुष शक्ती करुनी।।**
**विकसित मंदार कुंद जाती सौगंधानिल हेतुनी।।**
**अलि असती त्या नदि[ति]रि हरि त्या घेउन शोभे जाऊनी।।**
**मंगलकर शरदिंदु रश्मिराशिने निशातम नाशूनी।।**
**असे टाकिले जेथे त्या कालिंदीच्या करतरलानी।।**
**सीतल मृदु वालुकि केशव वरद प्रभु पावे शोभेला।।**
**(शीतल मृदुवालुकी पावला असेचि यदुपति शोभेला।।)**[2]
**तद्दर्शन मोदानि धूतले ज्यानि असे हृद्रोगाला।। श्रीशुक।।३।।**
**श्रुति परि पावति मनोरथांता आत्मबंधुकारणि रचती।।**
**कुचकुंकुमचर्चित निज वसने आसन त्या सकल हि युवती।।**
**वसे सदा योगेश्वर हृदयांतरी कल्पितासनाप्रती।।**
**जो त्रैलोक्यश्रिचे येक पद तनु धरणारा रमापती।।**
**प्रभु भगवानर्चित तो शोभे गोपिसभेमधि त्यावरती।।**
**अनंगदीपन करी असा जो स्तवुन पूजुनी तया प्रती।।**
**सहासलीलेक्षण विभ्रमयुत भृकुटि अशा हस्तांघ्रीला।।**
**अंकि ठेविल्या स्पर्शुन ईषत्कुपित अशा बोलति अबला**
**।।श्रीशुक०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील बत्तिसाव्या अध्यायातील १-१५ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.



[2] ही ओळ मुळात वरच्या बाजूस उभ्या रेघा मारून खोडली आहे.

**गोषवारा –**

श्रीशुक सांगू लागले, 'हरिदर्शनाची इच्छा धरून गोपी मोठ्याने गात होत्या. कुणी प्रलाप करीत होत्या. तेव्हा हार घातलेला, साक्षात् मदनच असा तो हरी प्रकट झाला. त्याला आलेला पाहून त्याच्या त्या प्रिय स्त्रिया अचेतन शरीरात प्राण फुंकावा तशा सचेत झाल्या. कुणी त्या हरीचे पदकमळ धरले, कुणी हस्तकमल धरले. कुणी त्याचा चंदनचर्चित बाहू धरला. कुणी त्याचा चावलेला तांबूल ओंजळीत घेतला. एका सुंदरीने त्याचे पदकमल आपल्या तप्त उरोजावर ठेवले. कुणी प्रेमाच्या आवेगाने ओठ चावीत होती. कुणी अनिमिष नेत्रांनी त्याच्याकडे बघत होती. कुणी त्याला डोळ्यातून हृदयात ठेवून डोळे मिटून एखाद्या योग्यासारखी त्याच्या आत असण्याचा अनुभव घेत होती. गोपींनी वेढलेला कृष्ण फार छान दिसत होता. त्याच्या गळ्यातल्या सुंगधी फुलांमागे भुंगे येऊ लागले. चांदण्यात गोपींनी वेढलेला तो यमुनेच्या तीरी शोभत होता. त्याच्या दर्शनानेच गोपींनी आपल्या मनातील काम नाहीसा केला. केशराची उटी लागलेले आपले उत्तरीय त्यांनी कृष्णाला बसायला दिले. त्यांचे कामोद्दीपन करणाऱ्या त्याला त्यांनी पूजले. आणि त्याच्याकडे लीला कटाक्ष टाकून, त्याचे हात, पाय आपल्या मांडीवर ठेवून लटके रागवून त्याला म्हणतात'.

**विवरण –**

- पहिल्या कडव्यात - येकदाच त्या उठती सकला गत प्राण येउन शरीरी - गेलेला प्राण पुन्हा शरीरात आल्यामुळे त्या सगळ्या एकदम उठल्या
- विकसितदृश - (आश्चर्यामुळे व आनंदामुळे) ज्यांचे डोळे विस्फारलेले आहेत अशा

- प्रेष्ठा - प्रियतमाला.
- पहिल्या कडव्यातील अन्वय -
  कोणि करांबुजा अंजलिने धरी. कोणि चंदनभूषित तद्वाहू अंसि घेदो करि. कोणि अंजलिने चर्वित तांबूला धरी.
- दुसऱ्या कडव्यातील अन्वय - प्रेमाच्या संरभे जी विव्हल ती दशनानी ओष्ठा चावि.
- जानि - ज्यांनी
- तिसऱ्या कडव्यात 'अलि असती त्या नदिरि हरि ...' या ठिकाणी नदितिरि असा शब्द असावा, मुळात नदि - असे ओळीच्या शेवटी आहे आणि 'रि' खालच्या ओळीत आहे. त्यामुळे नदितिरि असा शब्द तेथे गृहीत आहे.

या लावणीत ध्रुवपद व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात समान लांबीचे व सयमक असे आठ चरण आहेत आणि प्रत्येक कडव्याच्या शेवटी ध्रुवपदाच्या आवृत्तीची सूचना, ध्रुवपदातील सुरवातीची तीन अक्षरे उद्धृत करून केली आहे. पहिल्या कडव्यानंतर राहिलेली ही सूचना मी [ ] चौकटी कंसात घातली आहे.

ध्रुवपदाच्या द्विपदीच्या मात्रा अनुक्रमे २९ व ३० आहेत आणि त्यांची मोडणी अनुक्रमे प।प।प।‿ — —। आणि प।प।‿ ‿ ‿ ‿ —।प। अशी आहे.

कडव्याची द्विपदी ३० अशा समान मात्रेची असून त्यांची मोडणी मात्र वेगवेगळी आहे. त्यापैकी पहिल्या चरणाची प।प।प।— — —। अशी आहे आणि दुसऱ्या चरणाची प।प।प।— ‿ ‿ —। अशी आहे. या लावणीत अंतरा नाही.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील बत्तिसाव्या अध्यायातील १-१५ श्लोक (अर्थासहित) असे –

**।।श्रीशुक उवाच।। इति गोप्यः प्रगायन्त्यः प्रलपन्त्यश्च चित्रधा।।**
**रुरुदुः सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसाः।।१।।**

श्रीशुक म्हणाले – अशा रीतीने कृष्णाच्या दर्शनासाठी उतावीळ झालेल्या गोपी गाणी गात गात, विलाप करीत मोठमोठ्या आवाजात रडू लागल्या.

**तासामाविरभूच्छौरिः स्मयमानमुखाम्बुजः।।**
**पीताम्बरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः।।२।।**

(तेव्हा) हसरे मुखकमळ असणारा, पितांबर धारण करणारा, माळ घातलेला, साक्षात् मदनालाही मोहित करणारा कृष्ण त्यांच्या पुढे आविर्भूत झाला.

**तं विलोक्यागतं प्रेष्ठं प्रीत्युत्फुल्लदृशोऽबलाः।।**
**उत्तस्थुर्युगपत्सर्वास्तन्वः प्राणमिवागतम्।।३।।**

अत्यंत प्रिय अशा त्याला आलेले पाहून प्रेमाने डोळे फुलून आलेल्या त्या स्त्रिया एकदम उभ्या राहिल्या, जशी प्राण आलेली शरीरेच जणु !

**काचित्कराम्बुजं शौरेर्जगृहेऽञ्जलिना मुदा।।**
**काचिद्दधार तद्बाहुमंसे चन्दनभूषितम्।।४।।**

कुणी एकीने त्याचे करकमळ आपल्या दोन्ही हातांनी धरले. चंदनाच्या लेपाने अलंकृत केलेला त्याचा बाहू कुणी एकीने आपल्या खांद्यावर घेतला.

**काचिदञ्जलिनाऽगृह्णात्तन्वी ताम्बूलचर्वितम्।।**

**एका तदङ्घ्रिकमलं संतप्ता स्तनयोरधात्।।५।।**

कुणा एका सुंदरीने विड्याचा चोथा आपल्या ओंजळीत घेतला. तर व्याकूळलेल्या एकीने त्याची चरणकमले आपल्या स्तनांवर ठेवली.

**एका भ्रुकुटिमाबध्य प्रेमसंरम्भविह्वला।।**

**घ्नन्तीवैक्षत्कटाक्षेपैः संदष्टदशनच्छदा।।६।।**

प्रेमाच्या तीव्र आवेगाने व्याकूळ झालेली कुणी एक भुवया वर चढवून जणु कटाक्षांनी घायाळ करीतच पाहू लागली.

**अपराऽनिमिषद्दृग्भ्यां जुषाणा तन्मुखाम्बुजम्।।**

**आपीतमपि नातृप्यत्सन्तस्तच्चरणं यथा।।७।।**

पापणी न लववता सेवन केलेल्या त्याच्या मुखकमळाचे पुन्हा पुन्हा सेवन करणारी एकजण तृप्त होत नव्हती. जसे संत त्याच्या चरणाचे सेवन करतानाही तृप्त होत नाहीत.

**तं काचिन्नेत्ररन्ध्रेण हृदिकृत्य निमील्य च।।**

**पुलकाङ्ग्युपगुह्यास्ते योगीवानन्दसंप्लुता।।८।।**

कुणी एक आपल्या डोळ्यांच्या छिद्रातून त्याला आपल्या हृदयात घेऊन डोळे मिटून, त्याला आलिंगन देऊन, रोमांचित होऊन एखाद्या योग्यासारखी आनंदात बुडून गेली.

**सर्वास्ताः केशवालोकपरमोत्सवनिर्वृताः।।**

**जहुर्विरहजं तापं प्राज्ञं प्राप्य यथा जनाः।।९।।**

ज्याप्रमाणे लोक एखाद्या ज्ञानी माणसाच्या भेटीमुळे (मनातील संशय/अज्ञान दूर करतात), त्याप्रमाणे कृष्णाच्या दर्शनाच्या आत्यंतिक

आनंदाने सुखी झालेल्या त्या सर्व गोपींनी त्याच्या विरहामुळे झालेले दुःख सोडून दिले.

**ताभिर्विधूतशोकाभिर्भगवानच्युतो वृतः।।**
**व्यरोचताधिकं तात पुरुषः शक्तिभिर्यथा।।१०।।**

शोक पार धुवून टाकून दिलेल्या त्या स्त्रियांनी वेढलेला तो कृष्ण, सामर्थ्याने युक्त अशा माणसाप्रमाणे अधिकच शोभू लागला.

**ताः समादाय कालिन्द्या निर्विश्य पुलिनं विभुः।।**
**विकसत्कुन्दमन्दारसुरभ्यनिलषट्पदम्।।११।।**
**शरच्चन्द्रांशुसंदोहध्वस्तदोषातमः शिवम्।।**
**कृष्णाया हस्ततरलाचितकोमलवाद्द कम्।।१२।।**

त्या सर्व स्त्रियांना घेऊन (तो कृष्ण) उमललेल्या मंदार व कुंदाच्या फुलांवरच्या सुगंधी वाऱ्याबरोबर जिथे भुंगे आले आहेत अशा, शरद् ऋतूतील चंद्र किरणांच्या मुळे ज्याच्यावरचा अंधार नष्ट झालेला आहे अशा, यमुनेच्या तरंगरूपी हातांनी ज्यावर कोमल वाळू पसरली आहे, अशा यमुनेच्या शुभ वाळवंटात आला.

**तद्दर्शनाह्लादविधूतहृद्रुजो मनोरथान्तं श्रुतयो यथा ययुः।।**
**स्वैरुत्तरीयैः कुचकुङ्कुमाङ्कितैरचीक्लृपन्नासनमात्मबन्धवे।।१३।।**

त्याच्या दर्शनाच्या आनंदाने ज्यांच्या हृदयाची व्यथा धुतली गेली आहे, अशा त्या स्त्रिया इच्छापूर्तीला पावल्या. जशा श्रुती (त्याच्या दर्शनाने आप्तकाम होतात तशा !). स्तनांवरच्या केशराने रंगलेल्या आपल्या उत्तरीयांनी त्यांनी आपल्या आप्तासाठी आसन तयार केले.

**तत्रोपविष्टो भगवान्स ईश्वरो योगेश्वरान्तर्हृदि कल्पितासनः।।**

**चकास गोपीपरिषद्गतोऽर्चितस्त्रैलोक्यलक्ष्म्येकपदं वपुर्दधत्।।१४।।**

तिथे बसल्यावर गोपींनी वेढलेला आणि पूजिलेला तो भगवान् ईश्वर, थोर योग्यांच्या अन्तर्मनात ज्याच्यासाठी आसन घडविलेले असते असा तो, त्रैलोक्यातील शोभेचे एकमात्र स्थान असणारे असे शरीर धारण करणारा तो शोभून दिसू लागला.

**सभाजयित्वां तमनङ्गदीपनं सहासलीलेक्षणविभ्रमभ्रुवा।।**

**संस्पर्शनेनाङ्ककृताङ्घ्रिहस्तयोः संस्तुत्य ईषत्कुपिता बभाषिरे।।१५।।**

सुंदर हास्याने आकर्षक रीतीने पहाण्याने आणि भुवयांच्या सुंदर हालचालींनी, मांडीवर ठेवलेले त्याचे पाय व हात यांना स्पर्श करून, त्याची स्तुती करून, कामोद्दीपन करणाऱ्या त्याचा सत्कार करून मग किंचित् (लटके) रागावलेल्या त्या बोलू लागल्या.

----------

## अध्याय ४, लावणी २

### राग गौरी जिल्हा.

### तिताल.

**भजति येक त्यां भजति न भजता भजति येक ते उभयांला।।**

**भजति न ऐसे कोण असति हे प्रभुजी सांगा हो यांला।।धृ।।**

**श्रीहरि बोले भजति परस्पर उद्योगाते जे करती।।**

**स्वार्थास्तव नियमानि त्यांत सौहृद धर्म न हे सखि युवती।।**

**केवल नान्य स्वार्थास्तव ते भजति न भजता जे भजती।।**

ते करुणाकर अति पितरांच्या सरिसे असती या जगती।।
निरपवाद हा सौहृद धर्मचि असे यांत हो सखि सुमती।।
भजता हि न जे भजति न भजता मग हो कोठुनिया भजती।।
चा०।। ते आत्मारामच पूर्णकाम असती।।
अथवा न जाणती जे उपकाराप्रती।।
ऐसे ते असती गुरुद्रोहि दुर्मती।।
चा०।। हे सखि जंतू भजता हि न मी भजे तयांच्या वृत्तीला।।
सुखवाया निर्धनी लब्ध धन जाता चिंतेने मतिला।। भजति०।।१।।
तैसे अनन्य जाणे ऐशा प्रकारानि तुह्मि सखि अबला।।
मदर्थ वेद ज्ञाति लोकही मज ठायी अनुवृत्तीला।।
व्हाया त्यजिले भजता झालो गुप्त ह्मणुन प्रिय मी मजला।।
योग्य नसो हो प्रियकरि सखिनो तुह्मी असूया करण्याला।।
निरवद्यचि संयोग जयांचा ऐशा ज्या तुह्मि सत्कृतिला।।
तुमच्या विबुधायुने हि मी न समर्थचि प्रत्युपकाराला।।
चा०।। करण्यासि सखी तुह्मि गेह शृंखलाते।।
प्रेमानी तोडुन माझ्या भजनाते।।
निष्ठेने केले तुमच्या सत्कृतिते।।
चा०।। करोचि ती कृती प्रत्युपकारा तुमच्या सौशील्ये अबला।।
केवल होइन अनऋणि तैसा न करुनि मी हो
मत्कृतिला।।भजति०।।२।।
शरद निशा पाहुन रमाया हरिनि मनोहर गान वनी।।

केले ते व्रजवधुनी ऐकुन सकलचि गृहकृत्ये त्यजुनी।।
येती त्यांते पाहुन बोले हरि तुह्मि जाउन सति सदनी।।
पतिचे सेवन करुन असावे हे ऐकुन त्या सुंदरिनी।।
अति विव्हल कामातुर होउन पडती महिवर त्या हरिनी।।
पाहुनि त्यांतें रमवि दयेने हरि वनि कालिंदीपुलिनी।।
[चा०।।]तेव्हाच धन्य अह्मि आहो हे मानिती।।
ते जाणुन तेथे गुप्त होय श्रीपती।।
मग वनी हरीते सर्व पुसत फिरती।।
चा०।। तो वनि देखुन वधूपदानी मिश्रित श्रीहरीपदाप्रती।।
दुःखित होती वनी चालता पदे न मार्गी तिचि दिसती।। भजति।।३।।
तेव्हा करिती तर्क हरीनी कडे घेउनी त्या सखिला[।।]
पुष्पे वेचुन गुंफुन वेणी इथे रमविले त्यानि तिला।।
चित्ती वाटे असे ह्मणति तो दुःखित देखति त्या वधुला।।
मग पुसूनि तिज होती विस्मित थकल्या फिरतांनि वनाला।।
मग येउन कालि(लिं)दीपुलिनी विव्हल होउन धरणीला।।
विनवित पडती कितिक तऱ्हेनी हरिते त्या सकलहि अबला।।
चा०।। ऐशा ते पाहुन त्यासि हरी प्रकटला।।
मग सुखी होउनी त्या पुसती हरिला।।
भजता हि न भजती असे कोण यांला।।
चा०।। वद हे ऐकुन बोले केशव वरद प्रभु इंदिरापती।।

**तो मि न कधिही होइन तुमचा प्रत्युपकारि मि**
**महिवरती।।भजति०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील बत्तिसाव्या अध्यायातील १६-२२ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

"हे प्रभो, जे आपल्याला भजतात त्यांनाच जे भजतात. जे आपल्याला भजत नाहीत, त्यांनाही जे भजतात आणि जे आपल्याला भजतात आणि भजत नाहीत, अशा दोघांनाही जे भजतात आणि जे अशा दोघांनाही भजत नाहीत असे कोण असतात, ते सांगावे".

यावर श्रीहरीने उत्तर दिले, 'केवळ आपल्याला एखादा भजतो म्हणून त्याला भजणे हे स्वार्थाचे असते. त्यात प्रेम नसते. पण आपल्याला न भजणाऱ्यांनाही भजणारे असे लोक आपल्या आईवडीलांसारखे करुणामय असतात. हा सौहृद् धर्म असतो. आपल्याला भजणाऱ्यालाही जे भजत नाहीत, ते न भजणाऱ्याला कुठून भजतील ? असे लोक एकतर आत्माराम म्हणजे अखंड स्वतःत रमलेले तरी असतात किंवा गुरुद्रोही तरी ! अगं सखींनो ! जे मला भजतात म्हणूनच केवळ त्यांना मी भजत नाही. एखाद्या निर्धनाला मिळालेले धन हरवल्यावर तो जसा त्या धनासाठी अनन्यचित्त होतो, तशा तुम्ही सर्व घरदार सोडून देऊन माझ्या ठायी अनन्यचित्त व्हाव्यात म्हणून मी गुप्त झालो. यास्तव तुम्ही माझ्यावर रागविणे योग्य नाही. तुम्ही घरदार त्यागून एकनिष्ठेने मला भजता. तुमचे हे सत्कृत्य अत्यंत प्रशंसनीय आहे. ब्रह्मदेवाचे आयुष्य मिळाले तरी मी त्याची परतफेड करू शकणार नाही. तुमच्या या उपकाराची फेड तुमच्याच आणखी सुशीलतेने होईल. माझ्या कोणत्या कृतीने नाही'.

शरदातील रात्र पाहून कृष्णाने मधुर गान केले. ते ऐकताच गोपी गृहकृत्ये टाकून आल्या. कृष्ण त्यांना म्हणाला, 'तुम्ही घरी जाऊन पतिसेवा करा'. त्यावर त्या अत्यंत व्याकूळ होऊन, भान हरपून जमिनीवर पडल्या. मग हरीने त्यांना रमविले. तेव्हा त्या स्वतःला धन्य मानू लागल्या. त्यामुळे श्रीहरी गुप्त झाले. मग कृष्णाला शोधत, सर्व झाडांना विचारीत वनात फिरू लागल्या. श्रीहरीच्या पावलांमध्ये एका स्त्रीची पावले मिसळलेली पाहून त्या दुःखी झाल्या. पुढे तिची पावले दिसत नव्हती तेव्हा त्यांनी तर्क केला की हरी तिला कडेवर बसवून घेऊन गेला. त्यानं तिच्या वेणीत फुले माळली. पुढे त्यांना त्यांची दुःखी मैत्रीण दिसली. तिचा वृत्तान्त ऐकून त्यांना आश्चर्य वाटले. मग त्या सगळ्या कृष्णाला शोधीत यमुनातीरी आल्या. हरीला विनवीत व्याकूळ होऊन त्या धरणीवर पडल्या. हे पाहून हरी प्रकट झाला. मग सुखी होऊन त्यांनी कृष्णाला विचारले, आपल्याला भजणाऱ्यांना ही न भजणारे असे कोण हे सांग. हे ऐकून केशवाला वर देणारा लक्ष्मीपती विष्णू म्हणाला, 'मी कधीही तुमच्या उपकाराची परतफेड करू शकणार नाही'.

**विवरण –**

- भजति, न भजति - हे शब्द संस्कृतमधून जसेच्या तसे घेतले आहेत. भज् म्हणजे सेवा करणे, भजनी लागणे, उपकार करणे.

  गोपींनी विचारले की आपल्याला भजणाऱ्यांनाच भजणारे, न भजणाऱ्यांनाही भजणारे, दोघांनाही सारखेच भजणारे या मागचे रहस्य काय ?

  भगवंतांनी यावर जे उत्तर दिले त्याचा आशय असा - जे मला भजतात, त्यांच्या वृत्तीला मी भजत नाही. इथे वृत्ति हा शब्द

वागणे, कृती या अर्थी वापरला आहे. भागवतकारांचा शब्द अनुवृत्ति (मोबदला) असा आहे. त्यांच्या माझ्याप्रती असलेल्या सेवेचा मोबदला म्हणून मी त्यांना पावत नाही तर हाती आलेल्या पण नंतर हरवलेल्या अशा महत्त्वाच्या गोष्टीसाठी जसे मन तडफडते तशी तीव्र व्याकूळता असली की मी पावतो. गोपींना भगवंत म्हणून भेटला. भगवंताने आपल्या गुप्त होण्याचे कारणही इथे सांगितले.

- दुसऱ्या कडव्यातील अन्वय - मदर्थ वेद ज्ञाति लोकही त्यजिले. मज ठायी अनुवृत्तीला व्हाया, प्रिय मी भजता झालो गुप्त. ह्मणुन प्रियकरि सखिनो तुह्मी मजला असूया करण्याला योग्य नसो हो.
- दुसऱ्या कडव्यातील त्या पुढील चरणांचा अन्वय - विबुधायुने हि तुमच्या प्रत्युपकाराला करण्यासि मी समर्थचि न.
- विबुधायु - ब्रह्मदेवाचा आयुष्यकाळ. ब्रह्मदेवाचा एक अहोरात्र ८,६४००,००,००० इतक्या मानवी वर्षांचा असतो. या हिशोबाने त्याचे १०० वर्षाचे आयुर्मान किती असेल याची कल्पना केलेली बरी.
- सौशील्ये - सुशीलपणामुळे
- हरिनी – हरिणी
- अध्यायाचा विषय दुसऱ्या कडव्यातच पूर्ण होतो. त्यानंतरचे तिसरे व चौथे कडवे यात सुरवातीच्या पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांचा व चौथ्या अध्यायातील सुरवातीच्या भागातला विषय संक्षेपाने सांगितला आहे.

- गोपीची निष्ठा आणि आर्तता पाहून कृष्ण प्रकट होतो. मग त्याला गोपी प्रश्न विचारतात, तीच प्रस्तुत अध्यायाची सुरवात आहे. अशा रीतीने मागील विषयाची उजळणीही यात होते.

या लावणीत ध्रुवपद व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात समान लांबीचे सयमक असे सहा चरण असून पुढे तीन सयमक चरणांचा अंतरा आहे. त्यानंतर कडव्याच्या अखेरीस दोन ओळींचा मेळ आहे. अंतरा व मेळ यांच्या चाल बदलाची सूचना त्यांच्या सुरवातीला चा० असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्यानंतर ध्रुवपदाच्या आवृत्तीची सूचना, ध्रुवपदातील 'भजति' ही अक्षरे आवृत्त करून दिली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची आणि कडव्याची द्विपदी सममात्रिक असून प्रत्येकी ३० मात्रांची आहे. ध्रुवपदाच्या द्विपदीची मोडणी अनुक्रमे प।प।प।⌣⌣––। अशी आणि प।प।प।–––। अशी आहे.

कडव्यातील द्विपदीची मोडणी प।प।प।– ⌣ ⌣ –। आणि प।–।प।प।⌣⌣–। अशी आहे.

अंतऱ्याच्या एका चरणात २० मात्रा असून त्यांची मोडणी –।प।प।–। अशी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील बत्तिसाव्या अध्यायातील १६-२२ श्लोक (अर्थासहित) असे –

**गोप्य ऊचुः।। भजतोऽनुभजन्त्येक एक एतद्विपर्ययम्।।**

**नोभयांश्च भजन्त्येक एतन्नो ब्रूहि साधु भोः।।१६।।**

गोपी म्हणाल्या - काहीजण स्वतःला भजणाऱ्यांना भजतात. काहीजण याच्या अगदी विरुद्ध वागतात. (स्वतःला भजणाऱ्यांना भजत नाहीत). काही दोघांनाही भजत नाहीत (म्हणजे स्वतःला भजणाऱ्या आणि न भजणाऱ्यांनाही). हे कृष्णा तू हे आम्हाला नीट सांग.

**श्रीभगवानुवाच।। मिथो भजन्ति ये सख्यः स्वार्थैकान्तोद्यमा हि ते।।**

**न तत्र सौहृदं धर्मः स्वार्थार्थं तद्धि नान्यथा।।१७।।**

श्रीभगवान म्हणाले – हे सखींनो जे एकमेकांना भजतात, ते निव्वळ स्वार्थासाठीच खटपट करणारे असतात. मैत्र हा काही तिथे धर्म नसतो. ते (म्हणजे केवळ भजणाऱ्यालाच भजणे) सर्व स्वार्थासाठी असते, दुसऱ्या कशासाठी नसते.

**भजन्त्यभजतो ये वै करुणाः पितरो यथा।।**

**धर्मो निरपवादोऽत्र सौहृदं च सुमध्यमाः।।१८।।**

हे सुंदरींनो ! आई, वडीलांसारखे जे दयाळू असतात ते आपली सेवा न करणाऱ्यांचीही सेवा करतात. या ठिकाणी मैत्री हा अगदी आक्षेपरहित धर्म असतो.

**भजतोऽपि न वै केचिद्भजन्त्यभजतः कुतः।।**

**आत्मारामा ह्याप्तकामा अकृतज्ञा गुरुद्रुहः।।१९।।**

जे आपल्याला भजतात, त्यांनाही भजत नाहीत तर मग आपल्याला न भजणाऱ्यांना तर काय ? (ते चार प्रकारचे असतात). आत्माराम (स्वतःतच संतुष्ट असणारे), आप्तकाम (सगळ्या इच्छा पूर्ण झालेले), अकृतज्ञ (आपल्यावर केलेले उपकार न जाणणारे) आणि गुरुद्रोही !

**नाहं तु सख्यो भजतोऽपि जन्तून्भजाम्यमीषामनुवृत्तिवृत्तये।।**

**यथाऽधनो लब्धधने विनष्टे तच्चिन्तयाऽन्यन्निभृतो न वेद।।२०।।**

हे सखींनो ! मी मात्र मला भजणाऱ्या जीवांना सुद्धा त्यांच्या सेवेचे वेतन म्हणून भजत नाही. जसा निर्धन माणूस मिळालेले धन हरविल्यावर त्याच्याच विचाराने भारावलेला दुसरं काहीच जाणत नाही. (तसा माझा ध्यास लागणाऱ्यांना मी भजतो).

**एवं मदर्थोज्झितलोकवेदस्वानां हि वो मय्यनुवृत्तयेऽबलाः।।**
**मया परोक्षं भजता तिरोहितं माऽसूयितुं माऽर्हथ तत्प्रियं प्रियाः।।२१।।**

हे प्रिय स्त्रियांनो ! माझ्यासाठी अशाप्रकारे लोकाचार, धर्म आणि बांधवही सोडून दिलेल्या तुमच्या माझ्यावरील प्रेमासाठीच तुम्हाला अप्रत्यक्ष भजणारा मी अंतर्धान पावलो. प्रिय अशा माझ्यावर तुम्ही रागवणे योग्य नाही.

**न पारयेऽहं निरवद्यसंयुजां स्वसाधुकृत्यं विबुधायुषापि वः।।**
**या माऽभजन्दुर्जरगेहशृङ्खलाः संवृश्च्य तद्वः प्रतियातु साधुना।।२२।।**

अनिन्द्य संबंध असणाऱ्या तुमच्या माझ्यावरील सत्कृत्याची परतफेड करण्यास देवांच्या आयुष्याने सुद्धा मी समर्थ नाही. ज्या तुम्ही कधीच जीर्ण न होणारा गृहरूपी पाश पार तोडून मला भजता आहात, ते तुमचे (सत्कृत्य), तुमच्याच सत्कृत्याने फिटो !

----------

## अध्याय ५, लावणी १

### राग कालंगडा जिल्हा

### िताल

श्रीशुक बोले असे सुपेशल हरि भाषण ऐकुनी।।
तदंगे पूर्णकाम कामिनी।।ध्रु।।
विरहज तापाप्रति टाकिती अनकूलचि प्रीतिनी।।
तशी अन्योन्यबद्ध बाहुनी।।
असती जी कामिनीरत्ने त्याच्या हि सहित त्या वनी।।
करि गोविंदचि आरंभुनी।।
रासक्रीडेप्रति गृहित ज्या कंठी मृगलोचनी।।
तयाच्या दोघि दोघि मधुनी।।
चा०।। जो योगेश्वर श्रीकृष्ण त्यानि शिरुनी।।
जो मंडित वृ(व्र)जनारिच्या मंडलानी।।
त्या रास उत्सवा करीच आरंभुनी।।
चा०।। ऐसे करि जो त्या हरिला मानिती सकल कामिनी।।
आपले निकट असे हे मनी।। श्रीशुक०।।१।।
तदा विमानी बसुन नभी सुर दारासह येती।।
शतशा होउन उत्सुकमती।।
तेथे दुंदुभिते वाजविती पुष्प वृष्टि करती।।
स्त्रीयासह गंधर्वांचे पती।।
अमलचि तद्यश गाति योषिता प्रियासहित असती।।

तयाची अती मधुर वाजती।।

चा०।। किंकिणी वलय नूपुरेंचि त्याचा अती।।

रव तुमुल होइ त्या रासमंडलाप्रती।।

तिथे होय सुशोभित देवकिसुत यदुपती।।

चा०।। हेममण्यामधे पाचूचा मणि जसा असे शोभुनी।।

तसा तोहि नंदनंदनवनी।। श्रीशुक०।।२।।

सस्मित भृगुटिविलासे चंचल कुचवसने करुनी।।

कपोली चपल कुंडलानी।।

कटि लवल्यानी चरणन्यासे बाहुच्च्यालनानी।।

वेणि कांचिच्या गाठि सुटुनी।।

जाती स्विद्यन्मुखि ऐशा त्या हरिवधु गाण्यानी।।

तडितपरि मेघमंडलातुनी।।

चा०।। शोभती हरीस्पर्शानि मुदित असती।।

ज्या तशा रतिप्रिय रक्तकंठि युवती।।

त्या नृत्यमान असताचि उच्च गाती।।

चा०।। आवृत झाले असे सकल जग ज्या गीते करुनी।।

अशा त्या क्रिडति आनंदुनी।।श्रीशुक।।३।।

कोणि मुकुंदासहित अमिश्रित उच्च स्वर जाती।।

करी जो तुष्ट इंदिरापती।।

साधु साधु हे सन्मानानी त्यानि ह्मणुन तीप्रती।।

तया परि मोठ्यानी जी सती।।

**ध्रुवतालाते करुनि गातसे तिला मान यदुपती।।**

**देतसे बहुत शिथिल असती।।**

**चा०।। मल्लिका कंकणे जयेचीच युवती।।**

**रासासि करुनिया परिश्रांत होइ ती।।**

**जो पार्श्व भागि हरि त्याच्या स्कंधाप्रती।।**

**चा०।।धरि बाहुनी ऐशा केशववरदप्रभुसी वनी।।**

**क्रीडा(ड)ती आनंदे कामिनी।। श्रीशुक०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील १-११ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

श्रीशुक म्हणाले, 'हरीचे असे मृदू भाषण ऐकून तसेच त्याच्या स्पर्शामुळे ज्यांचा काम तृप्त झाला आहे, अशा त्या गोपींची विरहवेदना शमली. त्यांनी एकमेकींचे बाहू धरले आणि त्यांच्यासह कृष्णाने रास आरंभला. दोघी दोघींच्या मध्ये तो योगेश्वर शिरला. प्रत्येकीला असे वाटत होते की कृष्ण आपल्याच जवळ आहे. तेव्हा देव पत्नींसह आले. आकाशात विमानांची दाटी झाली. पुष्पवर्षाव झाला. दुंदुभी वाजू लागल्या. गंधर्व पत्नींसह आले आणि त्याची धवलकीर्ती गाऊ लागले. कांकणे, वलये, नूपुर यांचे मंजूळ ध्वनी कोंदटले. सोन्याच्या मण्यात पाचू शोभावा तसा तो नंदनंदन गोपींमधे शोभू लागला. हास्य, नेत्रकटाक्ष, भ्रूविलास, घसरणाऱ्या ओढण्या, गालांपर्यंत येणारे लोंबणारे कुंडल, लवणाऱ्या कमरा, पदन्यास, हालचाली, वेणीच्या आणि कमरपट्ट्याच्या सुटणाऱ्या गाठी, घामेजलेली मुखे यामुळे त्या गोपी मेघमंडळात वीज

शोभावी तशा शोभत होत्या. त्या नाचता नाचता गात होत्या. सगळे विश्व त्या गानाने कोंदून गेले. एकजण त्याच्या स्वरात स्वर न मिसळता पण उच्च स्वरात गात होती. कृष्णाने तिची वाहवा केली. मग ती ध्रुवतालात गाऊ लागली. एक जण खूप थकली आणि मग केशवास वर देणाऱ्या प्रभू कृष्णाच्या खांद्यावर बाहू ठेवून विसावली. अशा त्या सुंदरी खेळू लागल्या.

**विवरण –**

- पहिल्या कडव्यातील अन्वय - अन्योन्यबद्धबाहुनी (=एकमेकींचे बाहू धरून) तशी कामिनी रत्ने असती, त्याच्या सहित त्या वनी गोविंदचि रासक्रीडेप्रती आरंभुनी करि.
- दुसऱ्या कडव्यात तीन चरणांत मिळून अन्वय आहे -
  तयाची (देवपत्नी आणि गंधर्व स्त्रिया यांची) किंकिणी, वलये, नूपुरेंचि अती मधुर वाजती। तयाचा अति तुमुल रव होई.
- स्विद्यन्मुखि - ज्यांची मुखे (क्रीडा केल्यामुळे) घामेजलेली आहेत अशा.
- शेवटच्या कडव्यातील अन्वय -
  ध्रुवतालाते करुनि गातसे, तिला यदुपती बहुत मान देतसे. शिथिल असती मल्लिका कंकणे जयेचीच (ती) युवती रासासि करुनिया परिश्रांत होई.
- क्रीडती - मुळात 'क्रीडाती'ने एक मात्रा जास्त पडते. (कारण 15 मात्रांचा अंतरा आहे) शिवाय अर्थही सुसंगतपणे लागत नाही. म्हणून हा बदल सुचविला आहे.

या लावणीत ध्रुवपदासहित चार चरण असून प्रत्येक चरणात सहा सयमक चरण आहेत. दोन दोन चरणांच्या जोडीतील पहिला चरण दीर्घ

आहे, आणि दुसरा मात्र अखुड आहे. त्यानंतर तीन चरणांचा अंतरा आहे. हे तीनही चरण समान लांबीचे व सयमक आहेत. शेवटी दोन चरणांचा मेळ आहे. यातही एक लांब व दुसरा अखुड आहे. अंतरा आणि मेळ यांच्या चाल बदलाची सूचना त्यांच्या सुरवातीस ।।चा०।। असे म्हणून केली आहे. शेवटी ध्रुवपदाच्या आवर्तनाची सूचना ध्रुवपदाच्या सुरवातीची 'श्रीशुक' ही तीन अक्षरे उद्धृत करून केली आहे.

या लावणीच्या ध्रुवपदातील चरणांच्या मात्रा अनुक्रमे २७ व १६ असून त्यांची मोडणी अनुक्रमे प।प।प।‿—। आणि प।प। अशी आहे.

कडव्यातील द्विपदीच्या मात्रा २६ आणि १६ असून त्यांची मोडणी अनुक्रमे प।‿‿—‿—।प।‿—। आणि प।प आहे.

अंतऱ्यातील चरणाच्या २० मात्रा असून प।प।‿ ‿ —। अशी त्यांची मोडणी आहे.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील १-११ श्लोक (अर्थासहित) असे –

**।।श्रीशुक उवाच।। इत्थं भगवतो गोप्यः श्रुत्वा वाचः सुपेशलाः।।**
**जहुर्विरहजं तापं तदङ्गोपचिताशिषः।।१।।**

अशाप्रकारे भगवंताचे मधुर बोलणे ऐकून, त्याच्या अंगांच्या स्पर्शामुळे ज्यांच्या इच्छा तृप्त झाल्या आहेत, अशा त्या गोपींनी आपल्याला विरहाने झालेले दुःख टाकून दिले.

**तत्रारभत गोविन्दो रासक्रीडामनुव्रतैः।।**

**स्त्रीरत्नैरन्वितः प्रीतैरन्योन्याबद्धबाहुभिः।।२।।**

एकमेकींचे बाहू धरलेल्या, कृष्णाशी एकनिष्ठ असलेल्या अशा सुंदर स्त्रियांसमवेत असलेल्या कृष्णाने रासक्रीडेस प्रारंभ केला.

**रासोत्सवः संप्रवृत्तो गोपीमण्डलमण्डितः।।**

**योगेश्वरेण कृष्णेन तासां मध्ये द्वयोर्द्वयोः।।**

**प्रविष्टेन गृहीतानां कण्ठे स्वनिकटं स्त्रियः।।३।।**

**यं मन्येरन्नभस्तावद्विमानशतसंकुलम्।।**

**दिवौकसां सदाराणामौत्सुक्यापहृतात्मनाम्।।४।।**

दोघी दोघींच्यामधे प्रवेशलेल्या त्या योगेश्वर कृष्णाने कंठाशी आलिंगलेल्या त्या गोपींचा फेर धरल्यामुळे सुंदर दिसणारा रास नावाचा आनंद सोहळा सुरू झाला. त्या कृष्णाला त्या गोपी अगदी आपल्याजवळ मानीत होत्या. उत्सुकतेने ज्यांचे मन भरून गेलं आहे, अशा पत्नींसह आलेल्या स्वर्गीच्या देवांच्या शेकडो विमानांमुळे नभ गजबजून गेले.

**ततो दुन्दुभयो नेदुर्निपेतुः पुष्पवृष्टयः।।**

**जगुर्गन्धर्वपतयः सस्त्रीकास्तद्यशोऽमलम्।।५।।**

तेव्हा दुंदुभी वाजू लागल्या पुष्पवर्षाव होऊ लागला. गंधर्वनायक आपापल्या पत्नींसह कृष्णाची निर्मळ कीर्ती गाऊ लागले.

**वलयानां नूपुराणां किङ्किणीनां च योषिताम्।।**

**सप्रियाणामभूच्छब्दस्तुमुलो रासमण्डले।।६।।**

आपल्या प्रियकरासह असलेल्या त्या स्त्रियांच्या कांकणांचा, नूपुरांचा, घुंगरांचा मोठा आवाज, त्या रासक्रीडेच्या मंडलामधे होऊ लागला.

**तत्रातिशुशुभे ताभिर्भगवान्देवकीसुतः।।**

**मध्ये मणीनां हैमानां महामरकतो यथा।।७।।**

सोन्याच्या मोठ्या मण्यांमधे पाचूचे रत्न शोभावे तसा तो देवकीसुत त्या गोपींमुळे शोभून दिसत होता.

**पादन्यासैर्भुजविधुतिभिः सस्मितैर्भ्रूविलासै-**

**र्भज्यन्मध्यैश्चलकुचपटैः कुण्डलैर्गण्डलोलैः।।**

**स्विद्यन्मुख्यः कबररशनाग्रन्थयः कृष्णवध्वो**

**गायन्त्यस्तं तडित इव ता मेघचक्रे विरेजुः।।८।।**

पादन्यासांनी, हात हलविण्याने, मधुर हास्ययुक्त भ्रूभंगांनी, वाकणाऱ्या कमरांमुळे, स्तनांवरच्या घसरणाऱ्या वस्त्रांमुळे, गालांपर्यंत आलेल्या कुंडलांमुळे, ज्यांची मुखे घामाने डबडबली आहेत आणि ज्यांच्या केसांच्या आणि कमरपट्ट्यांच्या गाठी बांध शिथिल झाल्या आहेत अशा कृष्णाची गाणी म्हणणाऱ्या त्या कृष्णाशी खेळणाऱ्या स्त्रिया मेघमंडळात वीज चमकावी तशा शोभू लागल्या.

**उच्चैर्जगुर्नृत्यमाना रक्तकण्ठ्यो रतिप्रियाः।।**

**कृष्णाभिमर्शमुदिता यद्गीतेनेदमावृतम्।।९।।**

कृष्णाच्या स्पर्शामुळे आनंदित झालेल्या, प्रेमळ स्वर असणाऱ्या, खेळाची आवड असणाऱ्या, नाचणाऱ्या त्या गोपी उंच आवाजात गाऊ लागल्या, ज्या गीताने हे सर्व जग व्यापून गेले.

**काचित्समं मुकुन्देन स्वरजातीरमिश्रिताः।।**

**उन्निन्ये पूजिता तेन प्रीयता साधु साध्विति।।**

**तदेव ध्रुवमुन्निन्ये तस्यै मानं च बह्वदात्।।१०।।**

कृष्णाबरोबर पण त्याच्या स्वरांमधे आपला स्वर न मिसळता आलाप घेऊ लागली. त्यामुळे संतुष्ट झालेल्या कृष्णाने वा ! वा ! असे म्हणून तिचा गौरव केला. मग तोच आलाप तिने ध्रुव तालावर उंच स्वरात काढला. कृष्णाने तिला खूपच मान दिला.

**काचिद्रासपरिश्रान्ता पार्श्वस्थस्य गदाभृतः।।**

**जग्राह बाहुना स्कन्धं श्लथद्वलयमल्लिका।।११।।**

रासक्रीडेने थकलेल्या, कांकणे आणि मोगऱ्याचे गजरे सैल झालेल्या कुणी एकीने आपल्या हाताने बाजूलाच उभ्या असलेल्या कृष्णाचा खांदा धरला.

----------

## अध्याय ५, लावणी २

### राग परज जिल्हा

### तिताल.

**पंकजवत सौरभलिप्त चंदने करूनी।।**

**हरिभुज स्कंधगततया एक त्यातुनी।।धृ।।**

**सुंगूनि होय रोमांचित चुंबन करी ती।।**

**त्यामध्ये नाट्ये करुनि येक युवती।।**

**जो चपलकुंडलत्विषमंडितगंडा ती।।**

**हरिगंडि लावि तांबूलचर्विताप्रती।।**

**तिज हरि दे जी करि नृत्य गीत अशि युवती।।**

**मेखला नूपुरे तयेचीच वाजती।।**

**चा०।। पार्श्वस्थ हरीच्या हस्तपंकजाप्रती।।**

सुखकारक ऐशा श्रमुनि कुची ठेविती।।
श्रीपति जो अच्युत तया गोपि लाधती।।
चा०।। पति देवकिसुत कृष्णाच्या भुजयुगलानी।।
आलिंगित ऐशा गाति तया क्रीडुनी।। पंकज।।१।।
निजकेशस्रस्तस्रजा कर्णकमलानी।।
अलकानि अलंकृत गंडे खेदानी।।
आनने सुशोभित ज्याचि अशा मृगनयनी।।
किंकिणी वलय नूपुर या वाद्यानी।।
अलि गायक असती राससभी त्या स्थानी।।
भगवंता सह नाचति त्या आनंदुनी।।
चा०।। ऐशाच प्रकारे करून आलिंगुनी।।
हस्ताच्या स्पर्शे स्निग्ध वीक्षणानी।।
उद्दाम विलासे करून हसण्यानी।।
चा०।।शिशु जैसा स्वप्रतिबिंब विभ्रमे करूनी।।
हरि रमे तसा व्रज नारि सहीत क्रीडुनी।। पंकज।।२।।
विस्रस्तस्रग्भूषणा अशा व्रज युवती।।
ज्या तदंगसंगे अतिशय हर्षाप्रती।।
पावल्या ह्मणुनि अवशेंद्रिय ऐशा असती।।
अलकांसि तसे कुचपट्टिदुकूलाप्रती।।
हे कुरुश्रेष्ठ अवराया शक्त न होती।।
हरिविक्रीडित अवलोकुन होती अती।।

**चा०।। कामार्दित खेचरवधू मोह पावती।।**
**त्यापरी गणासह चंद्र विस्मयाप्रती।।**
**पावे त्या जितुक्या असती व्रजयुवती।।**
**चा०।। धरि तितकी रूपे आपण हरि लीलेनी।।**
**तो रमे तया सह आत्माराम हि वनी।। पंकज।।३।।**
**अति विहारानि ज्या श्रांत असति मृगनयनी।।**
**त्याचीच आनने करुणासह प्रीतिनी।।**
**हे नृपा पुशी हरि सुखद हस्तकमलानी।।**
**जी स्फुरत्पुरटकुंडलालकद्युतिनी।।**
**गंडश्री तिनि पीयूषतुल्य हसण्यानी।।**
**जे युक्त निरीक्षण त्यानि पतिसि पूजुनी।।**
**चा०।। झाला जो तत्कररुहस्पर्श त्यानी।।**
**अति आनंदित मन अशा गोपकामिनी।।**
**त्याचेच पुण्यकर कर्मांप्रति काननी।।**
**चा०।। त्या गाती केशववरदकृष्णभक्तीनी।।**
**जगि होति धन्य त्या सर्व गोपकामिनी।।पंकज।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील १२-२२ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

आपल्या खांद्यावर ठेवलेल्या कमळाचा सुवास येणाऱ्या, चंदनाची उटी लावलेल्या कृष्णाच्या हाताचे एकीने हुंगून चुंबन घेतले व ती रोमांचित

झाली. एकीने आपला गाल कृष्णाच्या गाली घासला तिच्या मुखात कृष्णाने चावलेला तांबूल दिला. जी नाचत गात होती, तिची मेखला, नूपुरे रुणझुणत होती. थकलेली, कुणी एक कृष्णाचे करकमळ आपल्या उरोजांवर ठेवत होती. कृष्णाच्या भुजांनी आलिंगिलेल्या गोपी गात होत्या. त्यांचे केशकलाप सुटले, माळा ओघळल्या, किंकणी, वलय नूपुर वाजत होती. भुंगे तिथले गायक होते. भगवंतासह त्या आनंदाने नाचत होत्या. आलिंगन, हाताचे स्पर्श, नेत्रकटाक्ष, मोकळे विलास, हसणे यामुळे शिशू जसा आपल्या प्रतिबिंबाशी खेळतो, तसा श्रीहरी त्या स्त्रियांसह खेळत होता. अति आनंदित झाल्यामुळे त्या युवतींचे आपल्या इंद्रियावरचेही नियंत्रण सुटले. केस, वस्त्रेही त्या आवरू शकत नव्हत्या. हे पाहून देवपत्नीही कामविव्हल झाल्या. चंद्रही विस्मयचकित झाला. जितक्या युवती तितकी रूपे हरीने लीलेने घेतली आणि तो आत्माराम वनात रमला. ज्या सुंदरी अतिविहाराने दमल्या, त्यांची श्रांत मुखे श्रीहरीने आपल्या करकमलाने पुसली. चमकणाऱ्या सोन्याच्या कुंडलांच्या व केसांच्या झळाळीने, अमृतासारख्या हसण्याने, प्रेमभऱ्या कटाक्षांनी त्या कृष्णास पुजू लागल्या. त्याच्या नखस्पर्शाने त्या आनंदित झाल्या. त्यांच्या कर्माने व कृष्णभक्तीने त्या गोपी जगी धन्य झाल्या.

**विवरण –**

- सुंगूनि - हुंगून
- चपलकुंडलत्विषमंडित गंडा ती हरिगंडि लावि
- त्विष - झळाळी
- गंड - गाल

हलणाऱ्या कुंडलांच्या झळाळीमुळे सुंदर दिसणाऱ्या आपल्या गालाला एक गोपी हरीच्या गालाला लावीत होती.

- **रमे** - रमवितो, रमती, रमे ही क्रियापदे अनेकदा वापरलेली आहेत. ती संस्कृत रम् वरून साधलेली आहेत. मनाला आनंद होईल असे खेळणे हा त्याचा अर्थ आहे. रम् च्या अर्थात मानसिक स्थितीचा अंश अधिक आहे.
- दुसऱ्या कडव्यातील अन्वय – निजकेशस्रस्तस्रजा (=आपल्या केसांमुळे आणि घसरून पडलेल्या गजऱ्यांमुळे), कर्णकमलानी, अलकानि, खेदानी अलंकृत गंडे (श्रमल्यामुळे आलेल्या घामाने सजवल्या गेलेल्या गालांमुळे) ज्याचि आनने सुशोभित अशा मृगनयनी ; किंकिणी वलय नूपुर या वाद्यानी, अलि गायक असती त्या राससभी स्थानी भगवंता सह त्या(गोपी) आनंदुनी नाचति.
- विस्रस्तस्रग्भूषणा – (क्रीडा करताना) ज्यांच्या माळा आणि आभूषणे गळून गेली आहेत अशा.
- स्फुरत्पुरटकुंडलालकद्युतिनी - पुरट = सोने, अलक = केस, द्युति = शोभा. लखलखणाऱ्या सोन्याच्या कुंडलांच्या व केसाच्या तेजामुळे.

या लावणीत ध्रुवपद व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात समान लांबीचे सयमक असे सहा चरण असून पुढे तीन सयमक चरणांचा अंतरा आहे. त्यानंतर कडव्याच्या अखेरीस दोन ओळींचा मेळ आहे. अंतरा व मेळ यांच्या चाल बदलाची सूचना त्यांच्या सुरवातीला ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्यानंतर ध्रुवपदाच्या आवृत्तीची सूचना, ध्रुवपदातील 'पंकज' ही अक्षरे आवृत्त करून दिली आहे.

या लावणीच्या ध्रुवपदाच्या द्विपदीच्या मात्रा अनुक्रमे २३ आणि २० आहेत. त्यांची मोडणी अनुक्रमे प।⌣ ⌣ – ⌣।प।–। आणि ⌣ ⌣ ⌣ ⌣।प।प। अशी आहे.

कडव्याच्या द्विपदीत अनुक्रमे २३ व १९ मात्रा आहेत व त्यांची मोडणी अनुक्रमे प।–।प।⌣ – – आणि – ⌣ –।– –।प।–। अशी आहे.

अंतऱ्याच्या चरणाच्या २१ मात्रांची मोडणी प।–।प।⌣ –। अशी दिसते.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील १२-२२ श्लोक (अर्थासहित) असे –

**तत्रैकांऽसगतं बाहुं कृष्णस्योत्पलसौरभम्।।**

**चन्दनालिप्तमाघ्राय हृष्टरोमा चुचुम्ब ह।।१२।।**

तेव्हा एकीने आपल्या खांद्यावर ठेवलेल्या, कमळाचा सुगंध असणाऱ्या, चंदनाची उटी लावलेल्या कृष्णाच्या हाताचा वास घेतला आणि आनंदाने रोमांचित होऊन तिने त्याचे चुंबन घेतले.

**कस्याश्चिन्नाट्यविक्षिप्तकुण्डलत्विषमण्डितम्।।**

**गण्डं गण्डे संदधत्या अदात्ताम्बूलचर्वितम्।।१३।।**

नाचताना हलणाऱ्या कुंडलांच्या प्रभेमुळे शोभणारा आपला गाल (कृष्णाच्या) गालावर भिडवणाऱ्या कुणा एकीला कृष्णाने विडा चावून दिला.

**नृत्यन्ती गायति काचित् कूजन्नूपुरमेखला।।**

**पार्श्वस्थाऽच्युतहस्ताब्जं श्रान्ताधात्स्तनयोः शिवम्।।१४।।**

रुणझुणणारे पैंजण आणि मेखला असलेल्या नाचणाऱ्या, गाणाऱ्या आणि त्यामुळे दमलेल्या एकीनो कृष्णाचे शुभ करकमळ आपल्या स्तनांवर ठेवले.

**गोप्यो लब्ध्वाऽच्युतं कान्तं श्रिय एकान्तवल्लभम्।।**

**गृहीतकण्ठ्यस्तद्दोर्भ्यां गायन्त्यस्तं विजह्रिरे।।१५।।**

लक्ष्मीचा अत्यंत प्रिय असा कृष्ण प्रिय पती म्हणून लाभल्यामुळे, त्याने आपल्या बाहूंनी कंठाशी आलिंगिलेल्या त्या त्याचे गुणगान गात खेळू लागल्या.

**कर्णोत्पलालकविटङ्ककपोलघर्म-**

**वक्त्रश्रियो वलयनूपुरघोषवाद्यैः।।**

**गोप्यः समं भगवता ननृतुः स्वकेश-**

**स्रस्तस्रजो भ्रमरगायकरासगोष्ठ्याम्।।१६।।**

कानावरचे कमळ, कुरळे केस, लोंबणारी कर्णभूषणे, गालावरील घर्मबिंदू यामुळे ज्यांची मुखे सुंदर दिसत आहेत अशा, ज्यांच्या केसांतून (नाचता नाचता) फुलांचे गजरे गळून पडले आहेत अशा, त्या गोपी, कांकणे, पैंजणरूपी वाद्यांच्या योगाने भुंग्यांच्या रूपातील गायक असणाऱ्या रासाच्या स्थली भगवंतासह नाचू लागल्या.

**एवं परिष्वङ्गकराभिमर्शस्निग्धेक्षणोद्दामविलासहासैः।।**

**रेमे रमेशो व्रजसुन्दरीभिर्यथाऽर्भकः स्वप्रतिबिम्बविभ्रमः।।१७।।**

अशा प्रकारे तो लक्ष्मीपती, आलिंगन, हातांनी स्पर्श करणे, प्रेमळ कटाक्ष टाकणे, उत्कट अशा शृंगार चेष्टा, स्मितहास्य यांच्या योगाने व्रजातील त्या

सुंदर स्त्रियांसह खेळू लागला, जसे एखादे लहान मूल आपल्याच प्रतिबिंबासह खेळते तसे.

**तदङ्गसङ्गप्रमुदाकुलेन्द्रियाः केशान्दुकूलं कुचपट्टिकां वा।।**

**नाञ्जः प्रतिव्योढुमलं व्रजस्त्रियो विस्त्रस्तमालाभरणाः कुरूद्वह।।१८।।**

हे परीक्षित राजा ! त्याच्या शरीराच्या स्पर्शाने झालेल्या आत्यंतिक आनंदाने ज्यांची इंद्रिये भारावून गेली आहेत अशा, माळा आणि आभूषणे ज्यांची गळून पडली आहेत अशा त्या व्रजस्त्रियांना आपले (मोकळे सुटलेले) केस, नाचून नाचून अस्ताव्यस्त (झालेली) रेशमी वस्त्रे आणि (नाचता नाचता घसरणारी) उत्तरीये सहजपणे सावरवत नव्हती.

**कृष्णविक्रीडितं वीक्ष्य मुमुहुः खेचरस्त्रियः।।**

**कामार्दिताः शशाङ्कश्च सगणो विस्मितोऽभवत्।।१९।।**

कृष्णाच्या लीला पाहून देवांच्या स्त्रिया कामातुर झाल्या व मूर्च्छित होऊ लागल्या.  चंद्र सुद्धा त्याच्या तारकागणांसह चकित झाला.

**कृत्वा तावन्तमात्मानं यावतीर्गोपयोषितः।।**

**रेमे स भगवांस्ताभिरात्मारामोऽपि लीलया।।२०।।**

तो भगवान् श्रीकृष्ण आत्माराम (स्वतःच्याच ठिकाणी पूर्ण रमणारा) असून सुद्धा, जेवढ्या गोपी होत्या तेवढ्या संख्येत आपल्या लीलेने स्वतःला करून त्यांच्यासह खेळू लागला.

**तासामतिविहारेण श्रान्तानां वदनानि सः।।**

**प्रामृजत् करुणः प्रेम्णा शंतमेनाङ्ग पाणिना।।२१।।**

हे राजा ! अति खेळल्यामुळे थकलेल्या त्यांची मुखे त्या दयाळू कृष्णाने स्वतः आपल्या कल्याणकारी हाताने पुसली.

**गोप्यः स्फुरत्पुरटकुण्डलकुन्तलत्विग्**

**गण्डश्रिया सुधितहासनिरीक्षणेन।।**

**मानं दधत्य ऋषभस्य जगुः कृतानि**

**पुण्यानि तत्कररुहस्पर्शप्रमोदाः।।२२।।**

त्याच्या बोटांच्या नखस्पर्शाने ज्यांना आनंद झाला आहे अशा त्या गोपी, आपल्या चमकणाऱ्या सोन्याच्या कुंडलाच्या आणि कुरळ्या केसांच्या शोभेने युक्त अशा गालावरच्या वैभवाने, अमृतासारख्या हास्य कटाक्षांनी (त्याचा) संमान करीत, त्या थोर पुरुषाच्या सत्कर्मांचे गायन करू लागल्या.

----------

## अध्याय ५, लावणी ३

**राग सोनी जिल्हा.**

**तिताल.**

**सुकुचकुंकुमे रंजित अंगाच्या संगे करुनी।।**

**स्रजच जी धृष्ट तया हेतुनी।।धृ।।**

**गंधर्वप सम अलिनी केले असे गमन मागुनी।।**

**जयाचे तो त्यासह जीवनी।।**

**जाइ परिश्रम हरावयासी श्रमुनि जसा हस्तिनी।।**

**सहित गजराज सेतु मोडुनी।।**

**हे नरपाळा मोठ्यानि हसणाऱ्या ज्या कामिनी।।**

**त्यानी अति सिंचित प्रेमानी।।**

अवलोकीत कुसुमवर्षि वैमानिक सुर जे त्यानी।।
स्तूयमान जो स्वरति असुनी।। सुकुच।।१।।
आपण इकडे तिकडे ऐसा रमे तोचि या वनी।।
गजेंद्रावत् लीलाकरुनी।।
कालिंदीउपवनी जलस्थलकुसुममोदवायुनी।।
युक्त असति ज्या दिशा पुलिनी।।
तिथे फिरे तो चेष्टित अलिकामिनीगणेकरुनी।।
मदच्युत गज जैसा करिणीनी।।
अशा प्रकारे करुनि विराजित चंद्रकरे करुनी।।
अशा ज्या सकल असति यामिनी।। सुकुच।।२।।
त्या ठायी शृंगाररसे युत शरत्कालि असती।।
प्रसिद्धचि काव्य कथा त्याप्रती।।
आपुल्या ठाइच असे रोकिले ज्यानी वीर्याप्रती।।
सत्यसंकल्पचि वधुगण अती।।
प्रीत जयाचे ठायि सेवितो केशव प्रभु यदुपती।।
बोलला ऐकुन हे नरपती।।
धर्मस्थापन अधर्मनाशन करावयासी जनी।।
मेदिनीवरि हे ब्रह्मन्मुनी।।सुकुच।।३।।
वक्ता कर्ताभिरक्षिता जो धर्माच्या सेतुला।।
जगत्प्रभु हरि वंशो जाहला।।
असतां परदारास्पर्शान या विरुद्धधर्माला।।

**कसा तो आचरिता जाहला।।**

**आप्तकाम यदुपती असुनिया निंदित कर्माला।।**

**कशास्तव तो करिता जाहला।।**

**अशा संशया माझ्या छेदी त्वर सूव्रत मुनी।।**

**वदे शुक ऐसे हे परिसुनी।।४।। सुकुच०।।४।।**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील २३-२९ या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

त्या गोपींच्या स्तनांवरची केशराची उटी त्यांच्या गळ्यातल्या फुलांच्या हारांना लागली. भुंग्यांचे थवे तिथे आकृष्ट झाले. अशा गोपींसह तो कृष्ण श्रम दूर करण्यासाठी यमुनेच्या पाण्यात शिरला. जसा एखादा गजराज हत्तीणींसमवेत पाण्यात शिरावा तसा ! आकाशात देवांनी पुष्पवृष्टी केली व ते कृष्णाचे स्तुतिगीत गाऊ लागले. यमुनेच्या तीरावर सुगंधित वारा वाहत होता आणि चंद्रकिरणांनी रात्र उजळून निघाली होती. शरद ऋतू विषयीच्या कथाकाव्यातील प्रसिद्ध शृंगार रस तिथे होता. सत्यसंकल्प अशा यदुपतीने वीर्य स्वतःच्या ठायीच रोखले. हे ऐकून परीक्षित राजाने विचारले – 'हे मुने धर्मस्थापन आणि अधर्मनाश करण्यासाठी यदुवंशामधे प्रभू प्रकट झाले. ते धर्माचे प्रवर्तक, उपदेशक व रक्षक आहेत. असे असता परस्त्रीशी संग करण्याचे अधर्माचरण त्यांनी का केले ? सर्व इच्छा पूर्ण झालेल्या यदुपतीने हे निंदित कर्म का केले ? या शंकेचे समाधान करा !' हे ऐकून शुकमुनी म्हणाले.

**विवरण** –

- पहिल्या कडव्यातील अन्वय-
  गंधर्वप (गंधर्वांचा नायक) सम अलिनी (भुंग्यांनी) जयाचे मागुनी गमन केले असे, तो त्यांसह जीवनी (=पाण्यात) परिश्रम हरावयासी जाइ.
- मेदिनीवरि – पृथ्वीवर. 'म'वरील मात्रा अस्पष्ट आहे. मात्र संदर्भावरून 'मेदिनी' शब्द असावा असे वाटते.
- वदे शुक ऐसे हे परिसुनि (=हे ऐकून शुकमुनी असे म्हणाले). याचा संदर्भ पुढच्या (५.४) लावणीशी आहे. ती सर्व शुकमुखाने आहे.

या लावणीत ध्रुवपद व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात समान लांबीचे सयमक असे सहा चरण असून पुढे तीन सयमक चरणांचा अंतरा आहे. त्यानंतर कडव्याच्या अखेरीस दोन ओळींचा मेळ आहे. अंतरा व मेळ यांच्या चाल बदलाची सूचना त्यांच्या सुरवातीला ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्यानंतर ध्रुवपदाच्या आवृत्तीची सूचना, ध्रुवपदातील 'भजति' ही अक्षरे आवृत्त करून दिली आहे.

या लावणीतील ध्रुवपदाची द्विपदी अनुक्रमे २६ व १६ मात्रांची असून त्यांची मोडणी अनुक्रमे प।–।प।प। आणि प।प। अशी आहे.

कडव्याच्या द्विपदीच्या २७ आणि १६ मात्रा असून मात्रांची मोडणी अशा प।प।‿ –।प। आणि ‿।प।‿ ‿ – ‿ –। अशी दिसते.

या लावणीस अंतरा नाही.

**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील २३-२९ श्लोक (अर्थासहित) असे –

**ताभिर्युतः श्रममपोहितुमङ्गसङ्ग-**
**घृष्टस्रजः सकुचकुङ्कुमरञ्जितायाः।।**
**गन्धर्वपालिभिरनुद्रुत आविशद्वाः**
**श्रान्तो गजीभिरिभराडिव भिन्नसेतुः।।२३।।**

स्तनांवरील केशराच्या उटीमुळे रंगलेल्या, अंगावर घासली गेल्यामुळे चुरगाळलेल्या सुंगधित माळेमुळे गंधर्वनायकच जणु असे भुंग्यांचे थवे ज्याचा पाठलाग करीत आहेत, असा (रासक्रीडेमुळे) दमलेला, त्या गोपींसमवेत असलेला कृष्ण श्रम घालविण्यासाठी बांध फोडून हत्तीणींसह पाण्यात शिरणाऱ्या गजराजासारखा पाण्यात शिरला.

**सोऽम्भस्यलं युवतिभिः परिषिच्यमानः**
**प्रेम्णेक्षितः प्रहसतीभिरितस्ततोऽङ्ग।।**
**वैमानिकैः कुसुमवर्षिभिरीड्यमानो**
**रेमे स्वयं स्वरतिरत्र गजेन्द्रलीलः।।२४।।**

हे राजा ! स्वतः आत्मतुष्ट असून सुद्धा एखाद्या मोठ्या हत्तीसारख्या लीला करणारा, हास्यविनोद करणाऱ्या युवतींकडून ज्याच्या अंगावर इकडून तिकडून पाणी शिंपडले जात होते असा, प्रेमाने पाहिला गेलेला, कुसुमवर्षाव करणाऱ्या देवतांकडून स्तविला जाणारा तो कृष्ण तिथे, खेळू लागला.

**ततश्च कृष्णोपवने जलस्थलप्रसूनगन्धानिलजुष्टदिक्तटे।।**

**चचार भृङ्गप्रमदागणावृतो यथा मदच्युद्द्विरदः करेणुभिः।।२५।।**

त्यानंतर हत्तीणींच्या समवेत असणाऱ्या मदमस्त हत्तीप्रमाणे, भुंगे आणि सुंदर स्त्रिया ज्याच्या मागोमाग येत आहेत असा तो कृष्ण पाण्यातल्या आणि जमिनीवरच्या फुलांमुळे सुवासिक झालेल्या वाऱ्यामुळे जिथल्या दिशोपदिशा व्यापल्या आहेत अशा यमुनेच्या तीरावरील उपवनांत फिरू लागला.

**एवं शशाङ्कांशुविराजिता निशाः स सत्यकामोऽनुरताबलागणः।।**

**सिषेव आत्मन्यवरुद्धसौरतः सर्वाः शरत्काव्यकथा रसाश्रयाः।।२६।।**

त्या सत्यसंकल्प असणाऱ्या, ज्याच्या ठिकाणी स्त्रिया अनुरक्त झाल्या आहेत अशा स्वतःच्या ठिकाणी वीर्याचा अवरोध करणाऱ्या कृष्णाने चंद्राच्या किरणांनी शोभून दिसणाऱ्या, शरदृतूविषयीच्या काव्यकथांमधील रसांना आश्रयभूत असणाऱ्या सर्व रात्री उपभोगल्या.

**राजोवाच।। संस्थापनाय धर्मस्य प्रशमायेतरस्य च।।**

**अवतीर्णो हि भगवानंशेन जगदीश्वरः।।२७।।**

राजा म्हणाला - धर्माच्या स्थापनेसाठी आणि अधर्माच्या नाशासाठी भगवान् श्रीविष्णू अंशरूपाने अवतरला होता.

**स कथं धर्मसेतूनां वक्ता कर्ताऽभिरक्षिता।।**

**प्रतीपमाचरद्ब्रह्मन्परदाराभिमर्शनम्।।२८।।**

हे ब्रह्मन्, अशा या कृष्णाने जो धर्माच्या मर्यादांचा उपदेशक, प्रवर्तक आणि संरक्षक आहे, त्यानेच परदारांचा उपभोग घेण्याचे निंदनीय कृत्य कसे केले ?

**आप्तकामो यदुपतिः कृतवान्वै जुगुप्सितम्।।**

**किमभिप्राय एतं नः संशयं छिन्धि सुव्रत।।२९।।**

ज्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत, अशा यदुपती कृष्णाने कोणत्या हेतूने हे निंद्य कर्म केले ? हे सुव्रत मुने ! माझ्या या शंकेचे निराकरण कारा.

----------

## अध्याय ५, लावणी ४

**राग भूपाळि जिल्हा.**

**तिताल.**

**प्रभू शक्त जे त्यांच्या साहस धर्म लंघनाला।।**
**दोष नसे ज्यापरी सर्वभुक् वन्ही जो त्याला।।धृ।।**
**आणु नये आचरण असे हे अनिश्वरानि मनी।।**
**कधि ही जरि आचरिले असता मूढमती होउनी।।**
**पावे नाशचि जसा अरुद्रहि अब्धिज विष पिउनी।।**
**समर्थवचना सत्य मानुनी मनि धीमंतानी।।**
**कर्म करावे तैसे जे तत्स्वभाषणे करुनी।।**
**युक्तचि त्या आचरिता क्वचिदाचरण करावे जनी।।**
**चा०।। जे निरहंकारी त्यां येथे न कुशल कर्मानी।।**
**अर्थही नार्थ तैसा नरपति तद्विपरीतानी।।**
**सुरतिर्यङ्मर्त्यचि जे संपूर्ण जीवही जनी।।**
**चा०।। त्याते करि शिक्षेते ऐसा जो श्रीपति सांवला।।**
**कुशलाकुशलान्वय संभव हा कसा होय त्याजला।। प्रभू शक्त जे।।१।।**

धुती योगसामर्थ्ये अखिलचि कर्मबंधनाला।।
सेवुन असती तृप्त जयाच्या पदपंकजरेणुला।।
अबद्ध ऐसे फिरती स्वेछे मुनि हि जो तनुला।।
स्वेछेनी धरणारा कोठुन बंध हाचि त्याला।।
गोपी तत्पति सकल देहि जे तदंतरी सावला।।
धीसाक्षी विचरे तो क्रीडे येथे धरि तनुला।।
चा०।। जो अनुग्रहासाठी भूतांच्या यादवपती।।
धरि मानुषदेहाते प्राणीही तत्पर होती।।
ज्या क्रीडा ऐकुनिया करि तैशा क्रीडांप्रती।।
चा०।। निश्चय निजपार्श्वस्थचि असती अपअपल्या अबला।।
तन्माये मोह्न व्रजौकस मानिति चित्ताला।। प्रभू शक्त जे।।२।।
असे ह्मणून करती नासूया देवकितनयाप्रती।।
भगवंताच्या प्रिया गृहागमनेछेसि न करती।।
तथापि त्या अच्युतानुमोदित सकल गोपयुवती।।
ब्राह्ममुहूर्ती गोकुलि निजमंदिराप्रती येती।।
हे विष्णूचे व्रजवधुसह विक्रीडित जे त्याप्रती।।
श्रद्धान्वित होऊन ऐकती वा वर्णन करिती।।
चा०।। हरिठायि परमभक्ती लाधुनिया सत्वर जगती।।
सन्मती धीर होऊन ते तत्कालचि त्यागिती।।
संपूर्ण कामरूपी जो हृद्रोगचि त्याप्रती।।
चा०।। अभिमाना सोडून भक्तिने करुणाकर हरिला।।

**नित्य भजति जे प्राणी त्याणी समूळ भव खाणिला।। प्रभू शक्त जे।।३।।**

**हरि गाता वनि मोहुन व्रजवधु आलेल्याते हरी।।**

**वदे गृही जा परिसुन पडता रमवि तया नदितिरी।।**

**ऐसे घडता गर्वित होती मग तेथुन श्रीहरी।।**

**गुप्त होय मग पुसत फिरति वनि तरुवल्लिसि सुंदरी।।**

**तो सखि दुःखित पाहुन तिज सह येउन यमुनातिरी।।**

**कितिक तऱ्हेने हरिसि विनविता प्रकट होउनी हरी।।**

**चा०।। रमविले तया परिसून नृप वदे मुने कृष्णानी।।**

**कसं केले निंदित हे कर्मचि वद हे परिसुनी।।**

**प्रभुस[3] न दोष शुक हे कथि येती त्या निजसदनी।।**

**चा०।। भक्तिनि ऐकति वर्णिति ही व्रजवधुसह हरिलीला।।**

**धन्य करी त्यां केशववरदाच्युत त्रिलोकाला।। प्रभू शक्त जे०।।४।।**

**समाप्त**

श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील ३०-४० या श्लोकांचा विषय या लावणीत आला आहे.

**गोषवारा –**

'जे सामर्थ्यवान् असतात, त्यांच्या धर्मोल्लंघनात काही दोष नसतो, जसा सर्वभक्षक अग्नी (काहीही खाण्याने अपवित्र होत नाही). पण ज्यांच्यात इतके सामर्थ्य नसते त्या मूर्खांनी असे काही करण्याचे मनात जरी आणले, तरी ते नाश पावतील. जसे समुद्र मंथनातून आलेले विष पिणाऱ्या



[3] मुळात सि लिहून नंतर त्याचा मात्रा योग तिरक्या रेघा मारून काटलेला दिसतो.

शंकरा शिवाय इतर कुणी (जर विष प्यायले तर तो नाश पावेल त्याप्रमाणे !) समर्थांचे वचन सत्य मानून तसे आचरण करावे, त्यांचे आचरणाचे नव्हे ! जे निरहंकारी असतात त्यांना येथे सत्कर्म करण्यातही काही मिळवायचे नसते आणि न करण्यानेही काही घालवायचे नसते. देव, मनुष्य, पशू या सर्वांच्या नियामकाचा चांगल्या-वाईट कर्मांशी संबंध कुठून ? योगबळाने जे सर्व कर्मबंध झुगारतात असे योगी ज्याच्या चरणकमळाच्या परागकणानेही तृप्त होतात, त्या आपल्या इच्छेने जन्म घेणाऱ्याला कर्मबंध कुठून ? गोपी, त्यांचे पती, सर्व प्राणिमात्र यांच्या अंतर्यामी असणारा साक्षी असा तो शरीर धारण करून येथे क्रीडा करतो. भूतमात्रांच्या अनुग्रहासाठी तो मनुष्य देह धारण करतो. ज्या क्रीडा ऐकून प्राणिमात्र त्याला भजतील अशाच क्रीडा तो करतो. गौळवाड्यातले ते गोप त्याच्या मायेने मोहित होऊन आपापल्या गोपी आपल्याच जवळ आहेत असे मानत होते. म्हणून त्यांना कृष्णाबद्दल असूया वाटत नव्हती. भगवंताच्या त्या प्रिय गोपींना आपल्या घरी जावेसे वाटेना. तथापि कृष्णाने अनुमोदन दिल्यावर ब्राह्ममुहूर्तीं त्या आपल्या घरी येतात. श्रीविष्णूंची ही व्रजगोपींसह झालेली क्रीडा जे श्रद्धेने ऐकतात, त्यांची हरीच्या ठायी भक्ती जडते. ते ज्ञानी होऊन तत्काल त्यांच्या हृदयातील कामरोग नष्ट करतात. त्यांचा भवजन्म नष्ट होतो.

हरी गाऊ लागल्यावर गोपी मोहित होऊन तिथे आल्या. त्यांना हरी, 'घरी जा' म्हणाला. मग व्याकूळ होऊन त्या तिथेच पडल्या. त्यांना हरीने मग यमुनातीरी रमविले. त्यांना याचा गर्व झाल्यावर तो गुप्त झाला. मग त्या झाडे, वेलींना विचारीत त्याचा शोध घेत वनात हिंडू लागल्या. दुःखी सखी दिसल्यावर त्या तिच्यासह यमुनातीरी आल्या. अनेक प्रकारे हरीला आळविल्यावर तो तिथे प्रकट झाला. आणि त्याने त्यांना रमविले.

हे ऐकून राजाने विचारले, हे असे निंदित कर्म कृष्णाने कसे केले ? मग शुक मुनी त्याला म्हणाले येथे प्रभूला दोष नाही. त्या आपल्या घरी येतात. जे ही गोपींसह केलेली कृष्णलीला ऐकतात त्यांना केशवाला वर देणारा अच्युत त्रैलोक्यात धन्य करतो !

**विवरण –**

- पहिल्या कडव्यातील अन्वय -

  समर्थवचना मनी सत्य मानुनी धीमंतांनी तैसे कर्म करावे. जे तत्स्वभाषणे करुनी युक्तचि त्या आचरिता (युक्त अशा आचरणाला), क्वचित् जनी आचरण करावे.
- सांवला - सावळा. हा शब्द दोनदा आला आहे. पण त्याच संदर्भात या अर्थाचा शब्द मूळ श्रीमद्भागवतात नाही.
- सुरतिर्यङ्मर्त्यंचि – सुर (=देव), तिर्यक् (=पशू), मर्त्य (=मनुष्यमात्र) हे सर्वच.
- स्वेछेने = स्वेच्छेने
- लाधुनिया = लाभूनिया
- तिसरे कडवे अन्वय –

  जगती (=या जगात) हरिठायी परमभक्ती लाधुनिया सत्वर सन्मती धीर होउन, ते तत्कालचि संपूर्ण कामरूपी जो हृद्रोगचि, त्याप्रती त्यागिती.
- त्याणी - त्यांनी
- शेवटच्या ओळीचा अन्वय -

  प्रभुस न दोष हे शुक त्या (=राजाला) कथि. त्या (गोपी) निजसदनी येती.

ही व्रजवधुसह हरिलीला (जे) भक्तिनि ऐकति, वर्णिति त्यां (=त्यांना) त्रिलोकाला धन्य करी. हे केशववरदा अच्युत !

या लावणीत ध्रुवपद् व पुढे चार कडवी आहेत. प्रत्येक कडव्यात समान लांबीचे सयमक असे सहा चरण असून पुढे तीन सयमक चरणांचा अंतरा आहे. त्यानंतर कडव्याच्या अखेरीस दोन ओळींचा मेळ आहे. अंतरा व मेळ यांच्या चाल बदलाची सूचना त्यांच्या सुरवातीला ।।चा०।। असे म्हणून दिली आहे. प्रत्येक कडव्यानंतर ध्रुवपदाच्या आवृत्तीची सूचना, ध्रुवपदातील 'प्रभू शक्त जे' ही अक्षरे आवृत्त करून दिली आहे.

या लावणीच्या ध्रुवपदाच्या पहिल्या चरणाची मात्रासंख्या २६ असून त्याची मोडणी प।प।प।—। अशी आहे. दुसऱ्या चरणाची मात्रासंख्या २४ असून त्याची मोडणी प।प।प। अशी आहे.

कडव्याच्या द्विपदीची मात्रासंख्या अनुक्रमे २६ व २८ असून त्या चरणांची मोडणी अनुक्रमे प।प।‿ — ‿ — ‿।‿ —। आणि ‿।प।प।प।‿—। अशी आहे.

अंतऱ्याच्या चरणाच्या २५ मात्रा असून त्यांची मोडणी —।प।—।प।‿——। अशी आहे.

या लावणीच्या दुसऱ्या चरणातच ३१ व्या अध्यायाचा विषय पूर्ण झाला आहे. पुढे तिसऱ्या व चौथ्या कडव्यात या आधीच्या लावणी अध्यायातील विषय नुसताच संक्षेपाने मांडला नसून चालू अध्यायाच्या विषयापर्यंत आणून भिडवला आहे. प्रत्येक अध्यायातील शेवटच्या लावणीच्या शेवटच्या कडव्यात अशा प्रकारे स्वाध्याय किंवा अनुसंधान भाष्य आहे. हा या लावणी अनुवादाचा विशेष आहे.



**या लावणीचे आधारभूत श्लोक –**

ज्या मूळ श्लोकांवर सदर लावणी आधारित आहे ते श्रीमद्भागवतातील दशमस्कंध पूर्वार्धातील तेहेतिसाव्या अध्यायातील ३०-४० श्लोक (अर्थासहित) असे –

**श्रीशुक उवाच।। धर्मव्यतिक्रमो दृष्ट ईश्वराणां च साहसम्।।**
**तेजीयसां न दोषाय वह्नेः सर्वभुजो यथा।।३०।।**

श्रीशुक म्हणाले - समर्थांनी केलेले धर्माचे उल्लंघन दिसते, त्यांचे साहसही दिसते. पण सर्वभक्षक अग्नीप्रमाणे तेजस्वी लोकांचे ते (कृत्य) दोषास कारण होत नाही.

**नैतत्समाचरेज्जातु मनसापि ह्यनीश्वरः।।**
**विनश्यत्याचरन्मौढ्याद्यथारुद्रोऽब्धिजं विषम्।।३१।।**

मात्र ज्याची ताकद नाही अशाने असे कृत्य मनानेही करू नये. (असे करण्याचे मनातही आणू नये). मूर्खपणामुळे असे आचरण करणारा, समुद्रमंथनातून निघालेले विष शिवाखेरीज पिणाऱ्या दुसऱ्या एखाद्यासारखा विनाश पावतो.

**ईश्वराणां वचः सत्यं तथैवाचरितं क्वचित्।।**
**तेषां यत्स्ववचोयुक्तं बुद्धिमांस्तत्समाचरेत्।।३२।।**

सामर्थ्यवान् माणसांचे बोलणे सत्य असते, तसे त्यांचे आचरण क्वचितच असते. बुद्धिमान् माणसाने त्याच्या बोलण्याशी युक्त असे वागावे.

**कुशलाचरितेनैषामिह स्वार्थो न विद्यते।।**
**विपर्ययेण वाऽनर्थो निरहंकारिणां प्रभो।।३३।।**

या निरहंकार लोकांच्या बाबतीत उत्तम आचरणामागे काही स्वार्थ नसतो. तर त्याच्या विरुद्ध वागण्यामुळे काही अनहित नसते.

**किमुताखिलसत्त्वानां तिर्यङ्मर्त्यदिवौकसाम्।।**

**ईशितुश्चेशितव्यानां कुशलाकुशलान्वयः।।३४।।**

असे आहे तर मग ज्यांच्यावर नियंत्रण ठेवायचे असते अशा प्राणी, मनुष्य आणि देव अशा सर्वच्या सर्व प्राणिमात्रांच्या नियामकाचा चांगल्या आणि वाईट कर्मांशी काय संबंध सांगावा ?

**यत्पादपङ्कजपरागनिषेवतृप्ता**

**योगप्रभावविधुताखिलकर्मबन्धाः।।**

**स्वैरं चरन्ति मुनयोऽपि न नह्यमाना-**

**स्तस्येच्छयात्तवपुषः कुत एव बन्धः।।३५।।**

ज्याच्या चरणकमळाच्या परागामुळे तृप्त झालेले, आणि योगाच्या सामर्थ्याने ज्यांनी सर्व कर्मबंध झिडकारून दिले आहेत असे मुनी (कर्मपाशांनी) बांधले न जाता यथेच्छ वागतात. (मग) स्वेच्छेने ज्याने शरीर धारण केले आहे त्याला बंध कुठला ?

**गोपीनां तत्पतीनां च सर्वेषामेव देहिनाम्।।**

**योऽन्तश्चरति सोऽध्यक्षः क्रीडनेनेह देहभाक्।।३६।।**

गोपी, त्यांचे पती आणि सर्वच प्राणिमात्र यांच्या हृदयांतरी असणारा तो अध्यक्ष लीलेनेच या जगात देह घेऊन आला.

**अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमास्थितः।।**

**भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत्।।३७।।**

भूतमात्रांवर अनुग्रह करण्यासाठी मनुष्य देह धारण करणारा तो तशाच प्रकारच्या लीला करतो, ज्या ऐकून मनुष्य तत्पर होईल.



**नासूयन्खलु कृष्णाय मोहितास्तस्य मायया।।**

**मन्यमानाः स्वपार्श्वस्थान्स्वान्स्वान्दारान्व्रजौकसः।।३८।।**

कृष्णाच्या मायेने मोहित झालेले व्रजवासी आपआपल्या पत्नी आपल्या बाजूलाच आहेत असे मानीत होते, आणि त्यामुळे त्यांनी कृष्णाचा मत्सर केला नाही.

**ब्रह्मरात्र उपावृत्ते वासुदेवानुमोदिताः।।**

**अनिच्छन्त्यो ययुर्गोप्यः स्वगृहान्भगवत्प्रियाः।।३९।।**

ब्राह्म मुहूर्त जवळ आला असताना, कृष्णाने अनुमोदन दिलेल्या गोपी इच्छा नसताना आपापल्या घरी गेल्या.

**विक्रीडितं व्रजवधूभिरिदं च विष्णोः**

**श्रद्धान्वितोऽनुश्रृणुयादथ वर्णयेद्यः।।**

**भक्तिं परां भगवति प्रतिलभ्य कामं**

**हृद्रोगमाश्वपहिनोत्यचिरेण धीरः।।४०।।**

व्रजगोपींसह केलेली श्रीविष्णूची ही रास क्रीडा जो श्रद्धावान् पुन्हा पुन्हा ऐकेल आणि वर्णन करेल त्याला भगवंताच्या ठायी परम भक्ती प्राप्त होईल आणि हृदयाचा रोग असा जो काम त्याचा उच्छेद होऊन लवकरच तो ज्ञानी होईल.

----------

# लावणीसूची

(चौकटी कंसातील संदर्भ श्रीमद्भागवतातील अध्याय व श्लोक असे आहेत.)



-----------------

# श्रीमद्भागवत श्लोकसूची

(चौकटी कंसातील संदर्भ रासपंच्याध्यायीतील अध्याय व लावणी क्रमांक असे आहेत.)

----------------

# संदर्भसूची

धोंड, म. वा. – **मऱ्हाटी लावणी**, मौज प्रकाशन, १९८८.

पटवर्धन, माधव त्रिं. – **छन्दोरचना**, कर्नाटक पब्लिशिंग हाउस, मुम्बई, १९३७.

मंजूळ, वा. ल. – **शाहीर रामजोशी**, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, २०११.

**सान्वयसार्थ श्रीमद्भागवत** – मूळ, अन्वय, पदच्छेद, सरळ अर्थ, टीपा आणि श्रीकृष्णोपनिषत् यांसह. स्कंध १० वा (पूर्वार्ध) भाग ७ वा., प्रकाशक - दामोदर सांवळाराम आणि मंडळी, ठाकुरद्वार, मुंबई नं. २, १९२८.

--------------------